Department of Public Instruction, Bombay.

मुंबई इलाख्यांतील सरकारी विद्याशाळाखातें.

# मराठी तिसरें पुस्तक.

## ( बालबोध. )

व्हर्न्याक्युलर टेक्स्ट बुक्स रिव्हिजन कमिटीनें तयार केलें.

# MARATHI THIRD BOOK.

Prepared

BY

The Vernacular Text Books Revision Committee.

PUBLISHED BY

MACMILLAN AND CO., LIMITED,

BOMBAY, CALCUTTA AND LONDON.

All Rights Reserved.

Price, 6 Ann[illegible] किंमत ६ आणे.




1906.

Department of Public Instruction, Bombay.

मुंबई इलाख्यांतील सरकारी विद्याशाळाखातें.

# मराठी तिसरें पुस्तक.

( बालबोध. )

व्हर्न्याक्युलर टेक्स्ट बुक्स रिव्हिजन कमिटीनें तयार केलें.

# MARATHI THIRD BOOK.

Prepared

BY

The Vernacular Text Books Revision Committee.

PUBLISHED BY

MACMILLAN AND CO., LIMITED,

BOMBAY, CALCUTTA AND LONDON.

All Rights Reserved.

*Price*, 6 *Annas*. किंमत ६ आणे.



# मराठी तिसऱ्या पुस्तकांतील धड्यांची

# अनुक्रमणिका.

| धड्याचें नांव. | पृष्ठ. |
|---|---|

## भाग दुसरा.
### भूगोलवर्णन.



## भाग तिसरा.
### सृष्टिज्ञान आणि पदार्थवर्णन.

# भाग पहिला.

## सामान्य विषय.

### १. आपलें नवें पुस्तक.



मुलांनो, आजपर्यंत तुमचीं एकंदर तीन पुस्तकें वाचून झालीं. लहान मुलांच्या पुस्तकांत तुम्ही मूळाक्षरें व बाराखड्या शिकलां. नंतर त्याच पुस्तकांतील मनोरंजक धडे व कविता तुम्हीं वाचिल्या. पहिलें पुस्तक वाचिल्यानें तुम्हांस मोठा लाभ झाला. त्यांत तुम्हांला जोडाक्षरांची माहिती झाली, व उत्तम प्रकारचा उपदेशही मिळाला. त्या पुस्तकांतील सृष्टिज्ञानाचे धडे वाचिल्यानें तुम्हांस कित्येक प्राण्यांची व पदार्थांची थोडथोडी माहिती झाली. त्यांतील कांहीं कविता इतक्या मौजेच्या आहेत कीं, आज देखील हौसेनें चांगल्या चालींवर त्या म्हणाव्या, असें तुम्हांस वाटेल. त्या दोन पुस्तकांतील सुंदर चित्रें पाहून तुम्हांला किती आनंद झाला बरें!

दुसरें पुस्तक सुरू केल्यावर तर तुमच्या ज्ञानांत अधिक भर पडूं लागली. चांगलें अक्षर काढण्यास व लहान लहान वाक्यें लिहिण्यास तुम्ही शिकलां. ज्या नव्या गोष्टी तुम्हीं वाचिल्या, त्यांपासून तुम्हीं चांगला बोध घेतला. सृष्टिज्ञानाच्या धड्यां-

पासून, कोणत्याही वस्तूकडे बारीक नजरेनें पाहून, तिच्या गुणांचें ज्ञान करून घेण्यास तुम्ही शिकलां. प्राणी किंवा पदार्थ ह्यांची एकमेकांशीं तुलना कशी करावी, तेंही तुम्हांस बरेंच समजूं लागलें. भूगोलवर्णनाच्या धड्यांवरून तुम्हांस दिशा कळूं लागल्या, आणि शाळेचा व गांवाचा नकाशा कसा काढावा, हेंही समजलें.

आतां तुम्ही नव्या पुस्तकास सुरवात करीत आहां. वा! हें पुस्तक किती मजेचें आहे! ह्यांत किती तरी मनोरंजक गोष्टी आहेत! किती तरी उत्तम उपदेश आहे! ह्यांतील प्रत्येक धड्यापासून कांहीं ना कांहीं नवीन गोष्ट तुम्हांला समजेल. भूगोलवर्णनाच्या धड्यांवरून पर्वत, नदी, समुद्र इत्यादि शब्दांचा अर्थ तुम्हांस चांगला कळेल. तसेंच माती किंवा रेती घेऊन पर्वत, नदी वगैरेचे साधे नमुने करण्यासही तुम्ही शिकाल. सृष्टिज्ञानाच्या धड्यांची काय गोष्ट सांगावी! त्यांजकडे जरा नजर मात्र फेका, म्हणजे कित्येक सामान्य पदार्थ, प्राणी व वनस्पति ह्यांचें वर्णन तुम्हांस आढळून येईल. हे धडे शिकल्यानें त्या पदार्थांदिकांचे उपयोग व गुण तुम्हांस फार चांगले समजतील. शेवटचा धडा वजनाविषयीं आहे. तो शिकल्यावर कांहीं जिन्नस विकत घेण्यास तुम्ही बाजारांत गेलां, तर खचीत फसणार नाहीं. हें पुस्तक शिकल्यानें तुम्हांस शुद्ध बोलतां व लिहितांही येईल. पण, मुलांनो, शिकतांना घाई करूं नका; कारण, कोणतीही मोठी गोष्ट थोड्या वेळांत साध्य होत नाहीं. तुम्ही घाई कराल किंवा अभ्यासाकडे लक्ष न द्याल, तर तुम्हांस पक्कें ज्ञान प्राप्त होणार नाहीं. वाचलेली गोष्ट खरी आहे किंवा नाहीं, ह्याची खातरी करून

घेण्यासाठीं यत्न करा. चांगला शोध करण्याविषयीं आळस कराल, तर तुम्हांस खरें ज्ञान न होतां फक्त पुस्तकी ज्ञान प्राप्त होईल.

---

## २. मोहाचा प्रतिकार.

गंगाबाई म्हणून एक गरीब बायको होती. तिला नारायण नांवाचा एक लहान मुलगा होता. तिचा नवरा वारल्यावर ती मुलाच्या विद्याभ्यासाकरितां पुण्यास येऊन राहिली होती. थोडे महिने लोटतात तों नवरात्र सुरू झालें. तेव्हां एके दिवशीं नारायणाचा सोबती, पांडू, त्याजकडे येऊन म्हणाला, "नारायणा, हे नवरात्राचे दिवस आहेत. ह्या दिवसांत एथें चतरशिंगीची यात्रा भरत असते. उद्यां अष्टमी, शुक्रवार आहे, म्हणून उद्यां तिसरे प्रहरीं चतरशिंगीस जाण्याचा आमच्या मंडळीनें बेत केला आहे. तूं येत असलास तर चल आम्हांबरोबर."

नारायण—हो! मीं अजून चतरशिंगी पाहिली नाहीं. माझ्या मनांत जावयाचें फार आहे. ही यात्रा मोठ्या मौजेची असते, असें ऐकतों.

पांडू—अरे, मौज पर किती मौज म्हणून सांगूं? एक तर ह्या दिवसांत जिकडे तिकडे रान हिरवें गार दिसतें, व जागजागीं पाणी आढळतें. वाटेनें मंडळीचा थाट हष्टीस पडतो. कितीएक गाड्यांत बसून जातात, कितीएक घोड्यांवर बसून जातात, कितीएक पायांनीं जातात. तेथें गेल्यावर, देवळाजवळ बाजार बसलेला असतो, तेथून लोक मेवामिठाई घेऊन खातात; डोंगरावर इकडे तिकडे फिरून हवा घेतात; आणि संध्याकाळपर्यंत अशा मौजा मारून, मग रमत रमत आपापल्या घराकडे परत येतात.

नारायण—असें आहे तर मी खचीत येईन; मला घेतल्याशिवाय तूं जाऊं नको. उद्यां मी घरीं तुझी वाट पाहात बसतों.

पांडू—बरें तर, आम्ही निघालों म्हणजे तुला बोलावणें पाठवूं. पण तुला एक विचारतों, त्याचें कसें? उद्यां भाड्याच्या गाडींत बसून जावें, असा आमच्या मंडळीचा बेत आहे; ह्याकरितां गाडीच्या भाड्याची व तेथें मेवामिठाई वगैरे घेऊं त्याच्या खर्चाची वर्गणी येईल, ती तूं देशील ना? दर असामीस सुमारें दोन आणे वर्गणी येईल, असें वाटतें.

नारायण—एवढें मात्र कठीण दिसतें; कां कीं, मजपाशीं एक पैसा देखील नाहीं, मग दोन आणे कोठचे?

पांडू—काय म्हणतोस? तुजपाशीं एक पैसा देखील नाहीं! तुझी आई तुला पैसे देत नाहीं काय?

नारायण—दर महिन्यास फीचे पैसे मात्र माझ्याजवळ देते. बाकी जें काय मला लागतें, तें ती आणून देते. रोख पैसा माझ्या हातीं देत नाहीं, व मलाही त्याची गरज लागत नाहीं.

पांडू—बरें, पण तुझी आई पैसे ठेविते ती जागा तुला ठाऊक आहे कीं नाहीं? ठाऊक असल्यास, तेथून दोन आण्यांचे पैसे घेतलेस, तर तें कांहीं तिला समजणार नाहीं.

नारायण—अरे पांडू, तूं मला असें कसें सांगतोस? आईला न कळत तिचे पैसे मी घेऊं काय? मग मीं चोरी केली असें होईल ना? चोरी करूं नये, लबाड बोलूं नये, असें आपले गुरुजी आपणांस नेहमीं सांगतात व आपण ऐकतों; त्याचें फळ काय? शिवाय, मीं चोरी केली, तर ती आईस कळल्याशिवाय कशी राहील? कळली म्हणजे ती मजवर विश्वास ठेवणार नाहीं व मायाही करणार नाहीं. ह्यासाठीं, पांडू, तूं अशी मसलत मला देऊं नको. खर्चाची वर्गणी द्यावयास मजपाशीं पैसे नाहींत, तर मी गाडींत बसणार नाहीं व मेवामिठाई खाणार नाहीं, म्हणजे झालें. हें न केलें म्हणून मौज दिसण्यांत कांहीं अंतर पडेल कीं काय?

पांडू—बरें, राहूं दे. तूं म्हणतोस तसेंच का होईना; पण आम्ही गाडींत बसून जाऊं, तेव्हां तुला गाडीबरोबर कसें चालवेल? आम्ही पुढें जाऊं, तूं मागें राहशील, आणि तुझी आमची चुकामूक पडेल. माणसांच्या दाटीमध्यें तूं भलतीकडे जाशील, मग तुला मौज कोण दाखविणार ?

नारायण—तर मग तुम्हांबरोबर न यावें हेंच बरें; पण चोरी करणें नको. मी यात्रेस जाणारच नाहीं; गेलोंच, तर माझ्यासारखा पायीं जाणारा सोबती मिळेल, त्याजबरोबर जाईन.

## ३. म्हातारा मनुष्य आणि त्याचा तट्टू.

कोणी एक म्हातारा मनुष्य आणि त्याचा मुलगा हे दोघे आपला तट्टू बाजारांत विकण्याकरितां हाकून नेत होते. त्याजकडे पाहून रस्त्यावरचा एक माणूस म्हणाला, "हा म्हातारा किती वेडा आहे, पाहा! तट्टाला ओझें होऊं नये, म्हणून आपण स्वतां पायीं चालून त्या मुलाला देखील त्यानें रखडत चालविलें आहे!" तें ऐकून म्हाताऱ्यानें मुलाला तट्टावर बसविलें, आणि आपण त्याला हाकीत त्याच्या मागून चालला.

तें पाहून दुसरा एक माणूस त्या मुलाला म्हणाला, "काय रे मुला, तुझा म्हातारा बाप पायीं चालत असतां तूं तट्टावर बसावें, हें तुला बरें वाटतें काय?" तें ऐकून मुलगा लाजल्यासारखा झाला. तें पाहून म्हाताऱ्यानें त्याला खालीं उतरलें, व आपण स्वतां वर बसला; आणि मुलगा त्याच्या मागून तट्टू हाकीत चालला.

अमळ पुढें जातात तों तिसरा मनुष्य बोलला, "हा बापडा लहान मुलगा चालून चालून थकला असतांही, ह्या थेरड्याला तट्टावर बसण्याची कांहीं लाज वाटत नाहीं! असा कसा बाप हा!" तें ऐकतांच म्हाताऱ्यानें त्या मुलाला आपल्या पाठीमागें तट्टावर बसविलें, आणि बाजाराची वाट धरिली.

ते थोडेसे पुढें गेले तों त्यांस चौथा माणूस भेटला. तो विचारितो, "अहो म्हातारे बुवा, हा तट्टू खुद्द तुमचाच आहे काय?" म्हातारा



म्हणाला, "होय, आमचाच आहे, महाराज." तो माणूस पुन्हा बोलला, "तुम्हीं हा तट्टू निर्दयपणें इतका लादला आहे कीं, तो खुद्द तुमचा आहे, असें कोणालाही वाटावयाचें नाहीं. त्या बापड्यानें तुम्हां दोघांना वाहून नेण्यापेक्षां, तुम्हींच दोघांनीं त्याला वाहून नेलें, तर काय वाईट होईल?"

हें कानीं पडतांच, ते बापलेक खालीं उतरले; त्यांनीं त्या तट्टाचे चारी पाय दोरीनें एकत्र बांधून, त्यांच्यामध्यें एक वांसा

घातला; आणि त्यास, बाप पुढें आणि मुलगा मागें, असे खांद्यावर घेऊन ते नदीच्या पुलावरून बाजाराकडे चालले.

ही मौज पाहण्यास लोकांचे थव्यांचे थवे लोटले. त्यांच्या कलकलाटानें तो तट्टू बुजाला, आणि मोकळा होण्याकरितां मोठी धडपड करूं लागला. त्यासरशी, ज्या दोरीनें त्याचे पाय बांधिले होते ती तुटली, आणि तो तट्टू वांशापासून निसटून एकदम खालीं नदींत पडून मेला !

तेव्हां त्या म्हाताऱ्याला फार वाईट वाटलें. त्यानें सगळ्यांना संतुष्ट करण्यासाठीं जे प्रयत्न केले, त्यांनीं कोणाला संतोष तर झाला नाहींच; पण त्याला फार श्रम पडून वरता त्याचा तट्टूही गेला !

---

## ४. परोपकारी संभू (भाग पहिला).

एका गांवीं विठूजी सुरवे नांवाचा एक शेतकरी राहात असे. त्याला संभू म्हणून एक दहा बारा वर्षांचा मुलगा होता. एके दिवशीं विठूजीनें कांहीं निरोप पोहोंचविण्याकरितां संभूला शेजारच्या गांवीं पाठविलें. तो गांव तीन चार कोस दूर असल्यामुळें, त्या गांवीं जाऊन परत येण्यास संभूला सहज एक दिवस लागणार होता; म्हणून त्याच्या आईनें त्याच्या बरोबर दशम्या, चटणी वगैरे खाण्याचे पदार्थ दिले.

त्या गांवीं जाण्याकरितां संभू सकाळींच निघाला. कांहींसा पुढें जातो तों त्याला वाटेंत एक कुत्रा भेटला. बरेच दिवस कांहीं खावयास मिळालें नसल्यामुळें, त्या कुत्र्याच्या पोटाची दामटी वळली होती. संभू जवळ येतांच, शेपूट हालवीत तो त्याच्या तोंडाकडे दीनमुद्रेनें पाहात उभा राहिला. कुत्र्याची ती अवस्था पाहून संभू आपणाशीं म्हणाला, "ह्याला फार भूक लागली आहे;

तेव्हां ह्याला कांहीं खाऊं घातलें पाहिजे." असें म्हणून त्यानें एक दशमी कुत्र्यापुढें टाकिली. ती कुत्र्यानें तेव्हांच खाऊन चट्ट केली. कुत्र्याचें समाधान झालेलें पाहून संभू पुढें चालता झाला.

कांहीं मार्ग चालून जातो इतक्यांत संभूला वाटेंत एक घोडें आढळलें. तें रस्त्याच्या बाजूला धडपडत पडलें होतें. संभूनें त्याजकडे जरा निरखून पाहिलें, तों त्याच्या पायांत एक भला भक्कम कांटा शिरला असल्याचें त्याला दिसून आलें. संभू आपल्याशीं म्हणाला, " दिवस तर बराच वर आला, व मला अजून जावयाचेंही बरेंच आहे. जर मी ह्या घोड्याचा कांटा काढण्यांत गुंतलों तर एथेंच दुपार होईल. पण तसें नाहीं, काय होईल तें होवो. माझ्यानें ह्या घोड्याला अशा हालांत टाकून पुढें जाववत नाहीं." असें म्हणून तो खालीं बसला, व त्यानें घोड्याच्या पायांतला कांटा हळूच ओढून काढून त्यांतील पू पिळून टाकिला. नंतर फराळाच्या डब्यांत पाणी भरून आणून तें त्याला पाजिलें, व जवळपासचें थोडें गवत उपटून त्याजपुढें टाकिलें. कांटा निघून पाय हलका झाल्यामुळें व पिण्यास पाणी मिळाल्यामुळें, त्या घोड्यास थोडक्याच वेळांत हुशारी येऊन तें उठून उभें राहिलें. तें पाहून संभू पुढें चालूं लागला.

जातां जातां संभू भर दुपारीं एका ओढ्याच्या कांठीं आला; व तेथें फराळ करण्याकरितां बसणार, तों त्याला ओढ्यांत एक म्हातारा दिसला. तो आंधळा असल्यामुळें चुकून खोल पाण्यांत काठीनें वाट चाचपीत उभा होता. तें पाहून संभूस दया येऊन, तो त्या आंधळ्यास हाक मारून म्हणाला, "म्हातारे बाबा, तुम्हांस

वाट सांपडत नाहीं काय? चार पावलें मागें सरून असे इकडे डावीकडे वळा." असें सांगून, तो स्वतां पढें जाऊन त्या आंधळ्यास




हातीं धरून कांठीं घेऊन आला. नंतर तो त्यास म्हणाला, "म्हातारे बाबा, आतां दुपारची वेळ झाली आहे, ही थोडी दशमी खाऊन पाणी प्या." आंधळा म्हणाला, "बाळा, किती तुझा दयाळू स्वभाव हा! देव तुझें कल्याण करो!" नंतर त्या दोघांनीं फराळ केला, व ते दोघे एकमेकांस पुसून आपापल्या मार्गास लागले.

## ८. परोपकारी संभू (भाग दुसरा.)

घरीं परत जाण्यास आपणास रात्र होऊं नये म्हणून संभू भराभर चालूं लागला. आतां तो गांव थोड्या अंतरावर राहिला होता; पण इतक्यांत त्याला वाटेंत एक भिकारी भेटला. त्याचा

एक पाय ढोपराखालीं तुटून गेलेला होता; व तो मोठ्या कष्टानें काठी टेकीत टेकीत चालला होता. संभूला पाहतांच तो लंगडा त्याजवळ कांहीं खाण्यास मागूं लागला. त्याची ती दीन दशा पाहून संभूला कळवळा आला, व त्याच्यापाशीं जें थोडेंबहूत फराळाचें शिल्लक राहिलें होतें, तें सर्व त्याला देऊन म्हणाला, "काय करूं बाबा, मजजवळ काय तें एवढेंच आहे; आणखी असतें तर तुला दिलें असतें." असें म्हणून तो पुढें चालूं लागला व त्या गांवीं जाऊन पोहोंचला.

गांवांत निरोप सांगावयाचा होता तो सांगून संभू लागलाच परत फिरला. तेव्हां तिसरा प्रहर टळला होता. आपणाला घरीं पोहोंचण्यास रात्र होणार असा संभूला धाक पडला; म्हणून तो चालवेल तितकें जलद चालत होता. अर्धी अधिक वाट चालून झाली तों दिवस मावळला. त्या दिवशीं चांदणें नव्हतें. काळोख पडूं लागला व रस्ता चांगलासा दिसेना. अशा स्थितींत रस्ता चुकून आपण भलतीकडेच जाऊं असें त्यास भय वाटूं लागलें. पुढें कसें करावें ह्या काळजींत तो आहे, इतक्यांत त्याला एक कुत्रा धांवत येतांना दिसला. तो सकाळचाच कुत्रा होता. तो शेपूट हालवून संभूस चाटूं लागला. तेव्हां त्यास थोडासा धीर येऊन तो कुत्र्यामागून जाऊं लागला. थोडासा पुढें जातो तों त्याला तें घोडेंही आढळलें. संभू सकाळपासून चालून चालून दमला होता. घोडें पाहतांच तो त्याच्याजवळ जाऊन, त्यास चुचकारून त्याजवर बसला. घोड्यानें जणू काय आपल्या उपकारकर्त्यास ओळखूनच, कांहीं दांडगाई न करितां, आपणावर बसूं दिलें. आणखी कांहीं पुढें जातो इतक्यांत संभूला तो आंधळा त्या

लंगड्यास खांद्यावर घेऊन जातांना भेटला. त्या दोघांनीं संभूस लागलेंच ओळखिलें, व "आम्ही तुझ्याच गांवीं जात आहों, चल आमच्या बरोबर," असें म्हणून त्यास त्याच्या घरापर्यंत सोबत केली.

संभूला येण्यास रात्र झाली म्हणून त्याचे आईबाप मोठ्या फिकीरींत होते. इतक्यांत ते सगळे येऊन पोहोंचले. आपल्या मुलास सोबत केल्याबद्दल विठूजीनें त्या दोघांचे आभार मानिले व त्यांना आपल्या घरीं राहवून घेतलें. त्यांनीं सर्व हकिकत सांगून म्हटलें, "सुरवेराव, तुमचें दैव फार थोर, म्हणून संभूसारखा गुणी मुलगा तुम्हांस लाभला आहे! त्याच्यासारखा गरिबांवर उपकार करणारा मनुष्य विरळा!"

नंतर कुत्रा व घोडें हीं कोठून आलीं तें संभूनें बापास सांगितलें, व त्या दोघांस त्यांनीं आपल्या घरीं पाळिलें.

---

## ६. एका प्रधानाचें चातुर्य.

पूर्वीं विजयनगर शहरामध्यें एक मोठा सावकार राहात असे. त्याजपाशीं हत्ती, घोडे, पालख्या वगैरे पुष्कळ संपत्ति होती. त्याला तीन मुलगे होते. सावकारानें मरते वेळीं लिहून ठेविलें कीं, आपल्या धाकट्या मुलास आपल्या दौलतीचा अर्धा हिस्सा, मधल्यास तिसरा हिस्सा, व थोरल्यास नववा हिस्सा मिळावा. पुढें सावकार मेल्यानंतर सर्व जिनगीची वांटणी त्याच्या लेखाप्रमाणें झाली. मात्र सतरा हत्ती होते ते वांटावयाचे राहिले. त्यांची वांटणी ठरलेल्या हिश्शांप्रमाणें करतां येईना. त्यामुळें मुलांमध्यें मोठा लढा पडला. शेवटीं तो वाद राजाकडे गेला. वाद ऐकून राजाही बुचकळ्यांत पडला. मग त्यानें आपल्या प्रधानास बोलावून त्याचा निवाडा करण्यास सांगितलें.

प्रधान फार चतुर पुरुष होता. त्यानें लढा कोठें पडला आहे हें तेव्हांच जाणिलें; आणि युक्तीशिवाय हा वाद तुटणार नाहीं असें मनांत आणून, तो मुलांस म्हणाला, "बाबांनो, तुम्हांला तुमच्या हिश्शापेक्षां थोडें जास्त मिळाल्यास तुमची कांहीं हरकत आहे काय?" मुलांनीं "अगदीं नाहीं" असें सांगितल्यावर, प्रधानानें त्यांचे ते सतरा हत्ती आणविले;



आणि त्यांच्यामध्यें आपला स्वतांचा अठरावा हत्ती उभा केला. नंतर तो धाकट्या मुलास म्हणाला, "ह्या अठरा हत्तींतले आपले निमे हत्ती घे कसे!" तेव्हां धाकट्यानें आपले नऊ हत्ती एकीकडे केले. मग प्रधान मधल्यास बोलला, "अठरांचा तिसरा हिस्सा, म्हणजे सहा हत्ती, तूं घे." त्यानें तसें केल्यावर, थोरल्यास हाक मारून तो म्हणाला, "चल! तूं आपले दोन हत्ती घे, म्हणजे तुझा नववा हिस्सा तुला मिळाला." ह्याप्रमाणें

वांटणी बिनतकरार करून दिल्यावर, प्रधानानें आपला हत्ती घरीं परत पाठविला. तो न्याय पाहून मुलगे फार खूश झाले; आणि राजानेंही प्रधानाची फार वाहवा केली.

## ७. पापाची वासना दाबणें.

सदू आणि रामा हे भाऊ भाऊ होते. ते एके दिवशीं सहल करीत असतां, एका आंबराईवरून जात होते. तेथलीं झाडें आंब्यांच्या भारानें अगदीं लवलीं होतीं. आंब्यांस पक्का पाड लागला होता, म्हणून ते राते, पिवळे व सुंदर दिसत होते. आंबे पाहून रामा सदूस म्हणाला, "काय रे भाऊ, हे पाहा आंबे कसे नामी पिकले आहेत! एथें आसपास कोणी दिसत नाहीं. चल, आपण त्यांतले कांहीं आंबे तोडूं."

सदू—छी, छी! रामा, असें मनांत देखील आणूं नको. अरे, हे आंबे आपले नव्हत; दुसऱ्याचे आहेत. ते त्याच्या नकळत घेणें हें नीट नाहीं.

रामा—आपले नसले म्हणून काय हरकत आहे? एथें हजारों आंबे आहेत; त्यांतले आपण दहा पांच घतले, तर ते कमी झाले असें आंब्यांच्या धन्याला देखील कळणार नाहीं.

सदू—अरे, त्यास कळलें नाहीं म्हणून काय झालें? आंबे पुष्कळ असले, तरी त्यांतले कांहीं धन्याच्या नकळत घेणें हें फार वाईट आहे. ती चोरी आहे; आणि चोरी करणें हें मोठें पाप आहे. मागें एकदां फौजदाराचे शिपाई, एका चोराला धरून, आपल्या घरावरून चालले असतां, बाबांनीं आपणांला काय सांगितलें? तुला आठवत नाहीं काय तें?

रामा—मला नाहीं बुवा आठवत. सांग बरें, बाबा काय म्हणाले तें?

सदू—अरे, बाबांनीं सांगितलें कीं माणसें पहिल्यानें लहान लहान पापें करितात, आणि तीं पचलीं म्हणजे हळू हळू मोठीं मोठीं पापें करूं लागतात. त्यांनीं त्यांचा शेवटीं नाश होतो. आणखी मी तुला सांगतों कीं, ह्या वेळीं आपण कोणा माणसाच्या दृष्टीस पडत नसलों, तरी देव आपणांस पाहातो. देवाची नजर आपणांवर नेहमीं असते, हें तुला ठाऊक नाहीं काय?

हें सदूचें बोलणें ऐकून रामा चटकन वाटेवर आला. त्याला आपल्या बोलण्याचा फार पस्तावा झाला. "देव आपणांस नेहमीं पाहातो" हें कानीं पडतांच त्या पापाच्या वासनेपासून त्याचें मन मागें वळलें, आणि तो सदूला म्हणाला "भाऊ, तूं मला अगदीं वेळेवर बोललास, हें फार चांगलें केलेंस. मी ह्यापुढें असें कधींही मनांत आणणार नाहीं."

आंबराईचा धनी कुंपणाच्या आड काम करीत होता. त्याच्या कानीं हें सगळें बोलणें पडलें, तेव्हां त्याला मोठें कौतुक वाटलें. तो पुढें येऊन म्हणाला, "शाबास मुलांनो! तुम्ही फार सच्चे मुलगे आहां! हे घ्या तुम्हांला पिकलेले आंबे." असें म्हणून त्यानें वीस आंबे मुलांच्या पदरांत बांधिले.

---

## ८. मुलांस बोध.

भुजंगप्रयात.

बरें सत्य बोला यथातथ्य चाला,
बहु मानिती लोक येणें तुम्हांला. ॥

धरा बुद्धि पोटीं विवेकें तुम्ही हो,
बरा गुण ता अंतरामाजि राहो. ॥ १ ॥
सदा दांत घासोनि तोंडा धुवावें,
कळाहीन घाणेरडें, बा, नसावें. ॥
सदा-सर्वदा यत्न सोडूं नये रे.
बहू काळ हा खेळ कामा न ये रे. ॥ २ ॥
दिसामाजि कांहीं तरी तें लिहावें.
प्रसंगीं अखंडीत वाचीत जावें. ॥
गुणश्रेष्ठ उपास्य त्याला करावें.
बरें बोलणें नित्य जीवीं धरावें. ॥ ३ ॥
बहू खेळ खोटाच आलस्य खोटा.
समस्तांशि भांडेल तोची करंटा. ॥
बहूतां जनालागिं जीवें भजावें.
भल्या संगतीं न्याय तेथें वसावें. ॥ ४ ॥
विवेकेंविणें सर्वही दंभ झाला,
बहू नेटका सज्जिला साज केला. ॥
प्रतीतीविणें बोलणें व्यर्थ होतें,
विचारेंविण सर्वही व्यर्थ हो तें. ॥ ५ ॥
'भला रे भला,' बोलती तें करावें,
बहूता जनांचे मुखें येश घ्यावें. ॥
परी शवटीं सर्व सोडोनि द्यावें.
मरावें परी कीर्तिरूपें उरावें. ॥ ६ ॥

रामदास.

## ९. सिंह आणि उंदीर.



एके दिवशीं एक मोठा सिंह अरण्यामध्यें, दमून भागून, एका झाडाखालीं स्वस्थ निजला होता. त्याच्या आंगावर उंदीर उड्या मारून खेळूं खिदळूं लागले. त्यामुळें तो सिंह जागा झाला, आणि अमळ चळवळूं लागला, तोंच एक लहानसा उंदीर त्याच्या पंजांत सांपडला.

सिंह त्या उंदराला ठार मारणार, इतक्यांत उंदीर दीनवाणीनें म्हणाला, "महाराज, आपण सर्व पशूंचे राजे आहां, फार थोर आहां, मजसारख्या पामराला मारून आपणांस काय लाभ होणार? कृपा करून आपण मला सोडाल, तर मी आपले उपकार जन्मभर आठवीन!" तें ऐकून सिंहाला त्याची कींव आली, आणि त्यानें त्याला सोडून दिलें. तेव्हां उंदीर त्याच्या पायां पडून निघून जातांना त्याला म्हणाला, "महाराज, आपण आज मजवर फार उपकार केले आहेत, ह्याबद्दल मी केव्हां तरी एक दिवस आपला उतराई होईन." तें ऐकून सिंहास हसूं

आलें आणि तो मनांत म्हणाला, “ हा उंदीर तो केवढा, आणि हा माझा उतराई होणार कसा ! ”

पुढें कांहीं दिवसांनीं, त्या अरण्यांत पारध्यांनीं एक भलें बळकट जाळें लावून ठेविलें, त्यांत तो सिंह सांपडला. त्यांतून सुटून जाण्यास त्यानें पुष्कळ धडपड केली, आणि आरडून ओरडून सगळें रान दणाणवून सोडिलें; परंतु त्याचा कांहीं उपाय चालेना. इतक्यांत तो लहान उंदीर त्या आरोळ्या ऐकून तेथें आला, आणि सिंहास ओळखून, त्या जाळ्याच्या दोऱ्या त्यानें आपल्या अणीदार दांतांनीं भराभर कुरतडून टाकिल्या, व सिंहाला त्यांतून मोकळें केलें.

जाळ्यांतून सुटल्यामुळें सिंह खूश झाला, व त्याला मागची आठवण होऊन तो मनांत म्हणाला, “ हा उंदीर लहानसा जीव असतांही, ह्या प्रसंगीं माझ्या किती उपयोगीं पडला ! ”

---

## १०. लोभी मनुष्य आणि ठक.

एका गांवांत एक लोभी मनुष्य राहात होता. त्याजकडे एक ठक गेला आणि म्हणाला, “ माझ्याकडे आज जेवणावळ व्हावयाची आहे, ह्याकरितां आपल्याकडचीं दोन मोठीं भांडीं मला द्या; काम होतांच तीं मी परत करीन. ” तेव्हां त्या लोभी माणसानें त्याला दोन मोठमोठीं तपेलीं दिलीं. तीं त्या ठकानें आपल्या घरीं नेलीं, आणि परत देतांना त्यांत लहान लहान दुसरीं कितीएक भांडीं घातलीं. तीं पाहून त्या लोभी मनुष्यानें ठकाला विचारिलें, “काय हो, तुम्हीं आमच्याकडून दोनच तपेलीं नेलीं असून, हीं इतकीं भांडीं कोठलीं ? ” ठकानें उत्तर दिलें , “ आपलीं तपेलीं आमच्या घरीं व्यालीं, त्यांचीं हीं बारकीं भांडीं पिलें होत. तीं तुमचींच, म्हणून तुम्ही घ्या. ” तें ऐकून, त्या लोभी माणसाला तो ठक मूर्ख तर वाटला, पण लोभामुळें त्यानें तीं सगळीं भांडीं ठेवून घेतलीं.

पुढें कांहीं दिवसांनीं तो ठक त्या लोभी माणसाकडे जाऊन, अशाच कांहीं लग्नकार्याच्या निमित्तानें त्यापाशीं पुष्कळ भांडीं मागूं लागला. तेव्हां लोभ्यानेंही, मोठ्या लाभाच्या आशेस भुतून, त्याला आपल्या घरांतलीं बहुतेक सर्व भांडीं दिलीं. पण ठकाच्या घरचें लग्नकार्य होऊन बरेच दिवस लोटले, तरी भांडीं आलीं नाहींत, हें पाहून लोभी स्वतां ठकाच्या घरीं गेला, व आपलीं भांडीं मागूं लागला. तेव्हां ठक म्हणाला, "तुमचीं भांडीं आमच्याकडे आणिलीं होतीं, तीं सगळीं मेलीं; आतां परत देण्यास कांहीं उरलें नाहीं!" त्यावर लोभ्यानें विचारिलें "भांडीं मेलीं कशीं?" तेव्हां ठकानें उत्तर दिलें, "जशीं तीं पूर्वींचीं भांडीं व्यालीं, तशीं हीं आतांचीं मेलीं!" बिचारा लोभी निरुत्तर होऊन, हाय हाय करीत घरीं गेला.

---

## ११. गोखल्यांचे रास्ते कसे बनले?



थोरले शाहू महाराज.

थोरले शाहू महाराज साताऱ्यास राज्य करीत असतां, चिपळूण एथें रामशेटजी दळ्ये नांवाचा एक उदमी राहात असे. त्यानें एकदां दोन हजार रुपये किंमतीचा मीठ, नारळ, वगैरे माल साताऱ्यास नेला. तेथें भिकाजी नाईक गोखले म्हणून एक मोठा प्रामाणिक सावकार होता, त्याच्या मार्फत रामशेटजीनें आपला सर्व माल विकला. मालास भाव चांगला आल्यामुळें, सुमारें चार हजार रुपये राम-

शेटजीच्या हातीं आले. इतक्यांत घाटामध्यें रामोशांचा दंगा झाल्याची खबर आली. म्हणून वरघाटी माल कांहीं न घेतां, रामशेटजी तसाच घरीं परत जाण्यास निघाला. निघतांना वाटखर्चापुरते रुपये बरोबर घेऊन, बाकीची सर्व रक्कम त्यानें भिकाजी नाइकाकडे अनामत ठेविली.

रामशेटजी घरीं परत जात असतां घाटांत एके ठिकाणीं त्याला रामोशांनीं गांठिलें; व द्रव्याच्या आशेनें त्यास मारहाण करून त्याचें गाठोडें पळविलें. त्या संकटांतून जीव बचावून तो कण्हत कुंथत घाट उतरला, तों त्याचें दुर्दैव पुन्हा उभें राहून, त्याला वाऱ्यानें पछाडिलें; व तो बिचारा घरीं न पोहोंचतां शेजारच्या एका खेड्यांत मरण पावला.

इकडे भिकाजी नाइकानें शेटजीची बरेच दिवस वाट पाहिली, तरी त्याचें ठिकाण नाहीं! तेव्हां त्यानें ती सर्व रक्कम व्याजीं लावून, आपला एक कारकून शेटजीच्या तपासाकरितां चिपळुणास पाठविला. कारकून परत आल्यावर त्यानें नाइकास म्हटलें, "नाईक, आतां ही रक्कम आपणाकडे ओढण्यास कांहींच हरकत नाहीं; कारण शेटजी घरीं जात असतां वाटेंतच मरण पावला, व घरीं त्याची बायको व चौदा पंधरा वर्षांचा एक मुलगा असून त्यांना त्याच्या व्यवहाराची मुळींच माहिती नाहीं."

तें ऐकून नाइकानें कारकुनाचा धिक्कार केला, आणि "अशी तुझी खोटी बुद्धि पुन्हा आढळल्यास माझ्या पेढीवरून तुला निघावें लागेल," अशी त्यास खरमरीतताकीद दिली.

पुढें तीन वर्षांनीं रामशेटजीचा मुलगा मोठा झाल्यावर नाइकानें त्याला आपणाकडे बोलावून आणिलें, आणि त्याच्या पुढें व्याजासुद्धां ती सर्व रक्कम ओतून म्हटलें, " बाबा, हे रुपये तुझे आहेत. ते तूं घेऊन जा. " हें ऐकतांच तो मुलगा चकित होऊन नाइकाच्या तोंडाकडे टकमक पाहात राहिला. तेव्हां नाइकानें पूर्वींचें वर्तमान सांगून त्याचा संशय दूर केला, व ती सुमारें पांच हजारांची रक्कम त्याच्या स्वाधीन केली. ती घेऊन तो मुलगा नाइकाच्या खरेपणाची वाहवा करीत घरीं गेला.

असें म्हणतात कीं, नाइकाच्या चोख व्यवहाराचा लौकिक शाहू महाराजांच्या कानीं पूर्वींच गेला होता. त्यांस ही सर्व हकिकत समजली, तेव्हां त्यांनीं गोखले ह्यांस दरबारांत बोलावून आणून पोशाक दिला, आणि म्हटलें, " नाईक, आमच्या शहरांत तुमच्यासारखे रास्त सावकार आहेत, ह्याचें आम्हांस मोठें भूषण वाटतें. तुम्ही रास्त व्यवहार करणारे म्हणून आम्ही तुमचें नांव रास्ते ठेवितों! " तेव्हांपासून भिकाजी नाईक ' गोखले ' होते ते ' रास्ते ' झाले! पुढें लवकरच पेशव्यांशीं सोयरगत झाल्यावर, रास्ते मोठे सरदार बनले.

---

## १२. करावें तसें भरावें.



चार चोरांनीं एका रात्रीं एका सावकाराचें घर फोडून, त्याचे सर्व दागदागिने व रोकड चोरून नेली; आणि तो चोरीचा माल आपसांत वांटून घेण्याकरितां ते रानांतील एका जुन्या पडक्या देवळाकडे जावयास निघाले. वाटेंत त्यांपैकीं एकजण म्हणाला, "गड्यांनो, आज आपला चांगला लाग साधला आहे! तर बाजारांतून कांहीं चांगलें खावयास आणूं. तें खाऊं पिऊं व नंतर स्वस्थपणें ह्या मालाची वांटणी करून घेऊं." ही गोष्ट सर्वांस पसंत पडली, व त्यांपैकीं दोघेजण बरोबर कांहीं रुपये घेऊन बाजाराकडे निघाले.

कांहींसे पुढें गेल्यावर त्यांपैकीं काळ्या म्हणाला, "काय रे

पिरू, आपण हा धंदा करूं लागल्यास आज वीस वर्षें होत आलीं, तरी आपणांजवळ शिल्लक काय राहिलें आहे ? कांहीं नाहीं ! आपण मरेपर्यंत असेच भुकेकंगाल राहणार ! असो. मागें झालें तें झालें; ह्यापुढें तरी दोन पैसे मागें टाकून पुढले दिवस कोठें तरी सुखांत घालवावे, असें मला वाटतें. आज खूप मिळकत झाली आहे, ती सर्व आपणां दोघांसच मिळेल अशी कांहीं युक्ति काढिली पाहिजे. खाण्याच्या पदार्थांत वीख घालून तें आपल्या दोघां साथीदारांस चारूं, म्हणजे सर्व मिळकत बिनबोभाट आपणां दोघांच्याच हातीं पडेल."

काळ्याची ही भयंकर कल्पना पिऱ्याच्या पसंतीस पडून, त्यांनीं बाजारांतून पेढे, बरफी, वगैरे मिठाई घेऊन, तींत विष कालवून देवळाची वाट धरिली.

इकडे त्यांच्या साथीदारांसही वरल्याप्रमाणें वाईट बुद्धि उत्पन्न होऊन, काळ्या व पिऱ्या ह्यांस आडांत ढकलून द्यावें, व आपण दोघांनींच सर्व माल वांटून घ्यावा, असा त्यांनीं बेत केला; आणि ते त्यांची वाट पाहात बसले. तों काळ्या व पिऱ्या तेथें येऊन पोहोंचले. तेव्हां ते दोघेजण त्यांस म्हणाले, "शाबास, राव ! बरे लौकर आलां ! चला आतां, आडावरून हातपाय धुवून येऊं. भूक फार लागली आहे !"

मग ते चौघेही आडावर गेले. तेथें काळ्या व पिऱ्या आडाच्या कांठावर उभे आहेत असें पाहून, त्यांना त्या दुसऱ्या दोघांनीं एकदम आंत लोटून दिलें. "प्या आतां पोटभर पाणी !" असें कुचेष्टेनें म्हणून ते मोठ्या हर्षानें परत आले; व

आणिलेली मिठाई त्यांनीं भराभर खाऊन टाकिली. पण मिठाई खाऊन उठतात, तों विष आंगांत भिनून, ते थोड्याच वेळानें तडफडून मरण पावले! ह्याप्रमाणें त्या दोघां दोघांनीं एकमेकांचें वाईट करावें अशी इच्छा धरल्यामुळें, ते सर्वही प्राणास मुकले; आणि ज्या मालाच्या आशेनें त्यांनीं एवढें दुष्ट कृत्य केलें, तो माल तेथें तसाच पडून राहिला!

'करावें तसें भरावें,' असें वडील माणसें म्हणतात, तें खोटें नाहीं.

---

## १३. घोष-यात्रा.

पांडव वनवासाचे शेवटचे दिवस द्वैतवनांत काढीत होते. तेव्हां कौरवांनीं मसलत केली कीं, पांडव रात्रीं स्वस्थ निजलेले सांपडले तर त्यांस ठार मारावें; तें नच साधेल, तर निदान त्यांस आपलें विपुल वैभव दाखवून लाजवावें. अशी गुप्त मसलत करून, आपले घोष म्हणजे रानांतील गुरांढोरांचे वाडे, ह्यांची देखरेख करण्याच्या मिषानें ते द्वैतवनाकडे चालले.

मार्गांत त्यांस एक सरोवर लागलें तेथें चित्रसेन गंधर्व आपल्या परिवारासह क्रीडा करीत होता. त्याचे सेवक कौरवांस त्या वाटेनें पुढें जाऊं देत ना. तेव्हां अर्थात् उभय पक्षांची लढाई जुंपली. तींत चित्रसेनाचा जय होऊन कौरवांचा पराभव झाला. गंधर्वांनीं दुर्योधन, दुःशासन इत्यादि कौरवांना पकडून त्यांच्या मुसक्या बांधिल्या, व त्यांना कैद करून आपल्या बरोबर चालविलें.

तें वर्तमान कौरवांच्या सेवकांनीं पळत जाऊन पांडवांस कळविलें. तेव्हां भीम म्हणाला, "ठीक! ह्यांत कांहीं वावगें झालें नाहीं! जे दुसऱ्यांचा घात करावयास पाहतात, त्यांचा घात देव असाच करतो!" पण तें बोलणें धर्मराजास आवडलें नाहीं. तो मान हालवून खिन्न मुद्रेनें बोलला, "बाबा भीमा,

कसे झाले तरी कौरव आपले भाऊ आहेत; त्यांस गंधर्वांसारखे परके लोक धरून नेत असतां आपण तें स्वस्थ राहून पाहावें, हें बरें नाहीं. अशा प्रसंगीं आपसांतील द्वेष विसरणें अगदीं अवश्य आहे. अर्जुना, सहदेवा, उठा, पाहतां काय? आपापलीं शस्त्रास्त्रें घ्या; आणि गंधर्वांपासून कौरवांना सोडवा. बाबांनो, अशी सोन्यासारखी संधि पुन्हा कधीं यावयाची नाहीं. आपल्या वैऱ्यांस संकटांतून सोडवून त्यांवर उपकार करण्यांत थोरपणा आहे; तो मिळविण्याची ही वेळ आहे."



तें ऐकून चौघेही पांडव गंधर्वांवर धावून गेले; व त्यांचा पराभव करून त्यांनीं कौरवांस सोडविलें व धर्मराजापुढें आणून

त्यांस उभें केलें. तेव्हां दुर्योधनाचें तोंड अगदीं उतरलेलें पाहून धर्मराजास वाईट वाटलें. तो म्हणाला, "बाबा सुयोधना, तुला खेद करण्याचें कांहीं कारण नाहीं. आम्ही तुझे बंधु आहों. तुला आम्हीं सोडविलें ह्यांत विशेष तें काय केलें ? आम्ही तुझे पाठराखे आहों. काळाच्याही हातून तुझें रक्षण करूं, मग इतरांची प्रतिष्ठा काय ! जा, स्वस्थ घरीं जा." तें ऐकून कौरव तेथून गुपचूप निघून आपल्या राजधानीस गेले.

किती हा धर्मराजाचा थोरपणा व उपकारबुद्धि ! त्याचें नांव 'युधिष्ठिर' असतां त्याला सर्वत्र 'धर्मराज' असें म्हणतात, तें अगदीं बरोबर आहे.

---

## १४. शाहाणा न्यायाधीश.

एका बाईला मूल होत नव्हतें. तिनें पुष्कळ नवस-सायास केले, पण मूल होईना. तेव्हां तिला दुर्बुद्धि उत्पन्न होऊन, तिनें दुसऱ्या एका बाईचा तान्हा मुलगा चोरून आणिला, व तो आपलाच मुलगा आहे, असें ती सांगूं लागली. मुलाच्या खऱ्या आईस हें कळलें, तेव्हां ती जाऊन आपला मुलगा मागूं लागली. दोघींचें भांडण सुरू झालें. ही म्हणे, "हा मुलगा माझा आहे," व ती म्हणे, "हा मुलगा माझा आहे."

शेवटीं तो तंटा एका न्यायाधिशाकडे गेला. त्यानें दोघींचें बोलणें ऐकून घेतलें, व पुरावा वगैरे पाहाण्याच्या विशेष भरीस न पडतां, एका शिपायास बोलावून त्यास म्हटलें, "अरे!

आपली तरवार उपस, आणि ह्या मुलाचे दोन सारखे तुकडे करून, एक एक तुकडा एकेकीच्या हवालीं कर.”



हे न्यायाधिशाचे शब्द ऐकून त्या दोघींपैकीं एकजण कांहीं एक न बोलतां उभी राहिली; परंतु दुसरी जी होती, ती त्या न्यायाधिशापुढें चटकर येऊन, हात जोडून, पदर पसरून, दीन वाणीनें म्हणाली, “महाराज, असें करूं नका. मी मुलाकरितां भांडणार नाहीं; मुलगा त्या बाईला द्या; माझी कांहीं आडकाठी नाहीं. तो कोठें तरी खुशाल असो म्हणजे झालें!”

हें कानीं पडतांच न्यायाधीश म्हणाला, “मुलगा ह्या बाईचाच आहे; तो हिच्या स्वाधीन करा. खऱ्या मायेशिवाय असे उद्गार तोंडांतून कधीं यावयाचे नाहींत.” ह्याप्रमाणें तो मुलगा त्या बाईस देऊन, त्या चोरट्या बाईस न्यायाधिशानें चांगली शिक्षा केली.

---

# १५. घट्टीकट्टी गरिबी व लुलीपांगळी श्रीमंती.



एके दिवशीं काशीराम नांवाच्या गरीब कुणब्यानें आपला मुलगा शिवचरण ह्यास कांहीं कामाकरितां दुसऱ्या गांवीं पाठविलें. तो गांव बराच दूर होता; त्यामुळें शिवचरण चालतां चालतां अगदीं थकून गेला, व त्यास भूकही लागली. आतां काय करावें, असा विचार करीत तो एका ओढ्याच्या कांठीं

झाडाखालीं विसांवा घेण्यास बसला. इतक्यांत एक मोठी सुंदर गाडी येतांना त्याच्या दृष्टीस पडली. तींत बिहारीलाल म्हणून एक श्रीमंत सावकार बसला होता. गाडीच्या पुढें व मागें पुष्कळ चाकरनौकर धावत होते. तें पाहून शिवचरणाच्या मनांत आलें कीं, मी जर असा श्रीमंत असतों, तर मला किती सुख झालें असतें ? बसावयास असली छानदार गाडी, घालावयास उंची पोशाक व खावयास गोड गोड पक्कान्नें मिळालीं असतीं !

शिवचरणाच्या मनांत हे विचार घोळत आहेत, तों ती गाडी पलीकडच्या बाजूस आंबराईंत उभी राहिली. चाकरांनीं गाडीजवळची जागा साफसूफ करून तेथें लहानशी बैठक पसरिली, व धन्याच्या फराळाची तयारी केली. नंतर त्यांनीं बिहारीलाल ह्यास गाडींतून उचलून खालीं उतरिलें, आणि त्याच्या काखांत कुबड्या दिल्या; तेव्हां त्यांच्या आधारानें तो उभा राहिला. मग दोघां चाकरांनीं त्यास दोहों बाजूंस धरिलें, तेव्हां तो हळू हळू फराळाच्या जागीं गेला. पण त्यास खालीं बसतांही येईना, म्हणून त्याच्या बगलांत हात घालून, चाकरांनीं त्यास हळूच खालीं बसविलें.

हा सर्व प्रकार शिवचरण दुरून पाहात होताच. तो उठून उभा राहिला व आपणाशींच म्हणूं लागला, "नको नको, ह्याच्यासारखी श्रीमंती मला नको ! नुसत्या श्रीमंतींत कांहीं सुख नाहीं ! हे माझे धडे खडे दोन पाय हजारों गाड्या-घोड्यांपेक्षां मला अधिक आहेत ! ह्या गृहस्थास दुसऱ्यानें हातीं

धरून चालवावें व बसवावें लागतें. अशी दुर्बळ अवस्था असल्यावर, असल्या छानदार गार्डींत बसण्यांत व गोड गोड पदार्थ खाण्यांत तरी सुख कोठलें? देवा, नको मला अशी छुलीपांगळी श्रीमंती ! मला सदां धडधाकट ठेव म्हणजे पुरे! मग मी गरीब राहिलों तरी हरकत नाहीं." असें म्हणून शिवचरण तडक पुढें चालता झाला.

---

## १६. कोल्हा आणि करकोचा.



करकोचा. कोल्हा.

एका कोल्ह्यानें एका करकोच्यास आपल्या घरीं मेजवानीस बोलाविलें; पण त्याची कुचेष्टा करण्याकरितां, फक्त खीर तेवढी एका ताटांत वाढून आणिली. मग ते दोघे एका ताटीं भोजनास बसले, तेव्हां कोल्ह्यानें ताटास जीभ लावून ती खीर भराभर चाटण्याचा सपाटा चालविला; परंतु, करकोच्याची चोंच लांब व बारीक असल्यामुळें, त्याच्या तोंडांत फारसें कांहीं जाईना. तें पाहून कोल्ह्यानें त्यास म्हटलें, "मामा, ही खीर तुम्हांला

आवडत नाहीं वाटतें ?" करकोच्यानें त्यावर कांहीं उत्तर दिलें नाहीं, पण त्याच्या मनाला ती गोष्ट लागली.



पुढें कांहीं दिवसांनीं करकोच्यानें कोल्ह्यास आपल्याकडे जेवावयास बोलाविलें व एका सुरईत आंबरस घालून त्याजपुढें ठेविला. सुरईचें पोट मोठें, पण गळा लांब आणि बारीक होता. त्यांत कोल्ह्याचें तोंड शिरेना ! तेव्हां करकोच्यानें आंत चोंच घालून कसें खावें तें त्यास दाखविलें. अशा प्रकारें करकोच्यानें आंबरस पोटभर खाल्ला; पण कोल्ह्यास, सुरईच्या पोटावर जे थेंब करकोच्याच्या चोंचींतून पडत, ते चाटून वेळ मारून न्यावी लागली. अशी त्याची उपासमर होऊन, त्याचा फार पाणउतारा झाला. तेथून निघून जातांना तो आपल्या मनांत म्हणाला, "झालें तें ठीकच झालें ! मी ह्याला कशाला नांवें ठेवूं ? द्यावें तसें घ्यावें !"

## १७. तान्हा भाऊ.

द्रुतविलंबित.

चिमकुला बहु बालक हा असे!
बघुनियां सुख गे मज होतसे.
चरण कोमल तांबुस हे किती!
वदन रम्य दिसे नयनांप्रती ॥ १ ॥
मिटुनियां बहु घट्ट मुठी धरी,
चरण हालवितो वरच्यावरी.
बघतसे टक लावुनियां किती!
बघुनियां सुख होय मनाप्रती. ॥ २ ॥
किति शरीर तरी मृदु लागतें!
भय मला, जननी, बहु वाटतें.
चिमकुला हसतो मज पाहुनी,
संवगड्या, मज जाणसि कीं मनीं? ॥ ३ ॥
दिपतसे बघतांच उजेड हा,
मिटितसे नयनां, जननी, पहा!
फिरविलें मुख कां? जननी, अगे!
रडतसे, वरतीहि न हा बघे! ॥ ४ ॥
चिमकुल्या, छकुल्या, न रडें, उगा!
धर करीं चिमणी अथवा फुगा.
जवळ घेउनियां तुज बैसतें,
चिमकुल्या, कमती वद काय तें. ॥ ५ ॥
शिकविते तुज भूक रडावया?
रडुं नको, तुज आणिन खावया.
धर करीं बहु सुंदर बाहुली,
सजवुनी स्वकरें, बघ! आणिली. ॥ ६ ॥

अजुनि हा, यमुने, बहु नेणता;
सुखेद होय पुढें तुज वाढतां.
अजुनि ह्या वदतां न मुळींच ये;
कळतसे न तुझें वदणें, सये ! ॥ ७ ॥

अजुनि दांत न याभेंति खावया,
न समजे करिं वस्तुहि घ्यावया !
चिमकुला तुजला जरि वाटतो,
पुढति होय तुझ्यासम थोर तो. ॥ ८ ॥

मो० ग० लोंढे.

---

## १८. तंबू.

प्रवासी लोकांस तंबूचा मोठा उपयोग होतो. तंबू पुष्कळ प्रकारचे असतात. कितीएकांस मध्यें एकच खांब असतो, त्यांस एकखांबी तंबू म्हणतात. कितीएकांस दोन खांब असतात, त्यांस दुखांबी तंबू म्हणतात. तंबू फार मोठा असला, म्हणजे त्यास डेरा असें म्हणतात. दरबारचा तंबू अतिशयच मोठा असतो, त्यास शामियाना असें म्हणतात.

तंबूच्या वरच्या भागास टप म्हणतात, व खालच्या भागास कनात म्हणतात. ही कनात सभोंवतीं लावितात. टप एकेरी किंवा दुहेरी, म्हणजे एकावर एक असें, असतें. टप दुहेरी असलें तर कनातही दुहेरी असते. दुहेरी तंबूंत वरून अथवा बाजूनें ऊन, थंडी किंवा पाऊस ह्यांची फारशी बाधा होत नाहीं.

जेव्हां राजेलोक स्वारीस किंवा शिकारीस निघतात, तेव्हां त्यांस राहावयास तंबू अवश्य लागतात. तसेंच, वरिष्ठ प्रतीचे

सरकारी कामगार, रयतेच्या अडचणी समजून घेऊन त्यांचें निवारण करावें, म्हणून आपापल्या प्रांतांत फिरत असतात, तेव्हां त्यांसही तंबूंची जरुरी असते. तंबूंशिवाय त्यांचें चालत नाहीं.



तंबू हें कापडाचें घरच आहे म्हणा ना! हें घर बहुतकरून जेथें पाहिजे तेथें थोड्याशा कष्टानें नेतां येतें, व लाकडी अगर लोखंडी मेखांस सुताच्या दोरांचे तणावे बांधून, तें तेव्हांच उभें करतां येतें. जसा खर्च करावा तशा खोल्या वगैरे सोई तंबूमध्यें करतां येतात. श्रीमंत लोक शोभेकरितां तंबूंस आंतल्या बाजूनें किनखाबानें किंवा सखलादीनें मढवितात.

तंबूची एक लहान जात आहे, तिला राहुटी म्हणतात. राहुटीहूनही एक लहान प्रकार आहे, त्यास पाल म्हणतात.

राहुट्या व पालें चाकर माणसांच्या किंवा गरीब लोकांच्या राहण्याच्या उपयोगीं पडतात.

जबलपूर येथील उद्योगशाळेंत सर्व प्रकारचे तंबू तयार करितात.

---

## १९. आपली कातडी निर्मळ कां व कशी राखावी ?

मोहरमचे दिवस होते. ताबूद तयार झाले. दिवसा रात्रीं रस्त्यांतून सोंगें फिरूं लागलीं. तें पाहून एके दिवशीं सोनेरी वाघाचें सोंग घेण्याचें जमालच्या मनांत त्याच्या सोबत्यांनीं भरविलें. जमाल लागलाच आपली आई, रोशनबी, हिला म्हणाला, "आई, मला सोनेरी वाघाचें सोंग घ्यावयाचें आहे. त्यासाठीं माझ्या आंगाला पेवडी व बेगड लाव." रोशनबीनें, कांहीं विचार न करितां, त्याला पेवडी लाविली, व मग आंगभर गोंद फासून वर बेगड डकविली. नंतर डामराचे काळे पट्ट ओढून पाठीमागें एक लांब शेपूटही लावून दिलें. झालें! जमाल फक्कडसा सोनेरी वाघ बनला! सोबत्यांनीं त्याच्या सोंगाची तारीफ केली, व त्याला ते शहरांत मिरविण्याकरितां घेऊन गेले. तें सर्व पाहून रोशनबीला मोठी खुशाली वाटली!

सर्व दिवसभर शहरांत भटकून जमाल दिवे लागल्यानंतर परत घरीं आला. फार थकून गेला असल्यामुळें, तो तसाच जाऊन निजला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं दिवस बराच वर आला, तरी तो उठला नाहीं, म्हणून रोशनबी त्याला उठविण्यास गेली; पण पाहते तों जमाल मृतप्राय पडला आहे! तें पाहतांच तिनें हंबरडा फोडिला; व "जमाल, तुला काय रे झालें! मला सोडून कसा रे गेलास!!" असा ती आक्रोश करूं लागली.

तो ऐकून शेजारचे लोक धावून आले. त्यांनाही जमालची एकाएकीं झालेली ती दशा पाहून मोठें नवल वाटलें. तेव्हां जमलेल्या मंडळीपैकीं एक इसम, जवळ एक डाक्टर राहात होते; त्यांजकडे लागलाच जाऊन त्यांना घेऊन आला.

डाक्टर येतांच त्यांनीं जमालच्या छातीला नळी लावून पाहिली; आणि, " घाबरूं नका, मुलगा अद्याप जिवंत आहे," असें सांगितलें. मुलाच्या आंगाकडे पाहतांच त्याची अशी अवस्था कां झाली तें त्यांच्या ध्यानांत आलें. त्यांनीं मुलास मोकळ्या जागेंत घेऊन, त्याचें सर्व आंग स्वच्छ धुऊन काढिलें, व दुसरेही कांहीं उपचार केले. तेव्हां कांहीं वेळानें जमालची थोडीबहूत हालचाल सुरू झाली, व त्यानें डोळे उघडिले. त्या वेळीं रोशनबीचा आनंद काय पुसावा ?

नंतर मुलाच्या औषधपाण्याची तजवीज सांगून डाक्टर म्हणाले, " रोशनबी, आजचा प्रसंग कां आला हें तुम्हांस समजलें काय ? हा गोंद-बेगडीचा परिणाम बरें ! तुम्हीं मुलाच्या सर्व आंगास गोंद फासून बेगड चिकटविली, त्यामुळें त्याच्या कातडीचीं सर्व छिद्रें बंद होऊन, त्यांच्यावाटे शरिरांतील विष मळाच्या रूपानें घामाबरोबर बाहेर पडण्याचें बंद झालें. शिवाय आंगांतील विषारी वायु छिद्रांतून बाहेर पडण्याचें व शुद्ध हवा आंत जाण्याचेंही बंद पडलें. अशामुळें सर्व विष आंतल्या आंत मुरून मुलगा मरणोन्मुख झाला. आणखी थोडा वेळ उपचार झाले नसते, तर तो मेलाही असता !" नंतर डाक्टर सर्वांकडे पाहून म्हणाले, " ह्यासाठीं नेहमीं स्नान करतांना आंगास साबण अगर

शिकेकाई लावून व घासून घासून तें साफ केलें पाहिजे. तसेंच खरखरीत कपड्यानें आंग घासून पुसलें पाहिजे. म्हणजे कातडीच्या रंध्रांतील मळ निघून जाऊन तीं खुलीं होतात. अशा प्रकारें तीं खुलीं न ठेविलीं, तर नानाप्रकारचीं दुखणीं येऊन कधीं कधीं आजच्यासारखे अपघातही होतात. बेटा जमाल, आतां पुन्हा असा वाघ होऊं नको हो!" असें बोलून डाक्टर चालते झाले.

---

## २०. दोन प्रामाणिक पुरुष.

हस्तिनापुरीं धर्मराज राज्य करीत होता. तेव्हां एकदां एका सावकारानें आपला एक जुना घरटा एका ब्राह्मणास घर बांधण्याकरितां दान दिला. पुढें ब्राह्मण पाया खणीत असतां त्याला एक हांडा सांपडला; तो सोन्याच्या नाण्यांनीं व हिरे-माणकांच्या दागिन्यांनीं भरलेला होता.

तो हांडा ब्राह्मणानें बाहेर काढिला, तेव्हां तेथें दुसरें कोणी नव्हतें. त्या वेळीं तें द्रव्य जर तो आपण घेता, तर त्याला कोणीं अडथळाही केला नसता; आणखी तेवढ्या द्रव्यानें तो मोठा श्रीमंत झाला असता. पण त्याच्या मनांत अशा प्रकारें श्रीमंत व्हावयाचें नव्हतें; प्रामाणिक राहावयाचें होतें!

जेव्हां तो घरटा सावकारापासून ब्राह्मणानें दान घेतला, तेव्हां ह्या द्रव्याची कल्पना देखील त्याच्या मनांत नव्हती. म्हणून हांडा जशाचा तसाच घेऊन, तो सावकाराकडे गेला; आणि हांडा सावकारापुढें ठेवून त्याला म्हणाला, "तुम्हीं मला घरटा दिला, त्यांत हें सगळें सोनें आणि जवाहीर सांपडलें; हें तुमचें आहे, तें तुमचें तुम्ही घ्या."

सावकार म्हणाला, "भटजी, असें कसें म्हणतां ? हें द्रव्य आतां माझें नव्हे; घरट्याचें दान मीं तुम्हांस केलें, तेव्हांच त्यांतलें सर्व कांहीं तुम्हांस दिलें. त्यांत आतां माझें कांहीं नाहीं. ह्याकरितां हें द्रव्य मी घेणार नाहीं. तें तुमचें तुम्ही न्या."



हें सावकाराचें म्हणणें ब्राह्मणास मान्य झालें नाहीं, व तो तें द्रव्य परत नेईना. सावकारही तें ठेवीना. असा त्यांचा लढा बराच वेळ चालला. तेव्हां ही गोष्ट लोकांस कळून त्या दोघांच्याही प्रामाणिकपणाचा मोठा लौकिक झाला. परंतु तें सांपडलेलें द्रव्य घेण्यास कोणीच कबूल होईना, म्हणून तो वाद शेवटीं धर्मराजाकडे गेला.

धर्मराजानें दोघांचें बोलणें ऐकून घेतलें, तेव्हां त्यालाही

मोठा विचार पडला. त्याला ते दोघेही सारखेच प्रामाणिक वाटले; परंतु द्रव्य अमक्यानें घ्यावें असें सांगतां येईना. तेव्हां त्यानें तें द्रव्य ठेवून घेऊन, दोघांसही, "उद्यां या, म्हणजे तुमचा वाद तोडूं," असें सांगितलें.

दुसऱ्या दिवशीं सावकार व ब्राह्मण राजसभेंत आले. तेव्हां धर्मराजानें त्या दोघांच्या प्रामाणिकपणाची प्रशंसा करून म्हटलें, "तुमच्यासारखे निर्लोभी व सत्यवक्ते पुरुष आमच्या राज्यांत नांदतात, हें पाहून आम्हांला मोठा आनंद होत आहे. आतां हें तुमचें द्रव्य खर्चून, लोकांच्या सोईसाठीं, तुम्हां दोघांच्याही नांवें, गंगेस एक मोठा घाट बांधण्याचें आम्हीं ठरविलें आहे." हा धर्मराजाचा ठराव ऐकून त्या उभयतांस व सर्व सभासदांसही संतोष झाला.

---

## २१. प्राप्तीचा अर्धा वांटा.

मराठ्यांच्या आरमाराचे सुभेदार कान्होजीराव आंग्रे, हे किल्ला कुलाबा एथें राहात असत. त्यांच्याकडे एकदां एक चमत्कारिक गोष्ट घडून आली म्हणून सांगतात, ती अशीः—

कुलाब्याजवळच अलीबाग एथें कान्होजीरावांच्या बागेंतील वाड्यांत त्यांच्या मुलीचें लग्न झालें. लग्नाचा सोहळा पुरा झाल्यावर, मांडव-परतणीच्या दिवशीं व्याहीमंडळीस व आपल्या इष्टमित्रांस बडी मेजवानी देण्याचा त्यांनीं बेत केला. त्या दिवशीं सगळें साहित्य तयार होतें, पण मासे मिळत ना; कां कीं, आदल्या रात्रीपासून वादळ होऊन दर्या फार खवळला असल्यामुळें मासे धरण्यास जाण्याला कोणी धजेना. तेव्हां मासे

कसे मिळतात ह्या विवंचनेंत सुभेदार होते. इतक्यांत सुमारें प्रहर दिवसास रावस जातीचे पांच सहा मासे घेऊन रेवस एथील बुध्या कोळी तेथें आला. त्यास देवडीवाल्यानें वाड्यांत पाठवून दिलें. ते उत्तम प्रतीचे ताजे मासे पाहून सुभेदारांस फार आनंद झाला; आणि माशांची काय पाहिजे ती किंमत मागण्यास त्यांनीं बुध्याला सांगितलें.

बुध्यानें उत्तर केलें, "साहेब, माझ्या उघड्या पाठीवर शंभर फटके मारा. हीच माझ्या माशांची किंमत! ह्यांत मी एक देखील फटका कमी घेणार नाहीं." हें वेड्यासारखें त्याचें मागणें ऐकून आम्ह्यांस व इतर मंडळीस मोठें आश्चर्य वाटलें. त्यांनीं त्याची पुष्कळ समजूत घातली, पण तो ऐकेना; आपलाच हेका धरून बसला. तेव्हां सुभेदार म्हणाले, "हा कोळी मोठा तऱ्हेवाईक दिसतो! आम्हांस तर माशांची गरज; त्यांवांचून आमचा खोळंबा झाला आहे; तर फटके हळूहळू मारून, त्याच्या म्हणण्याप्रमाणें माशांची किंमत त्याला आमच्या समक्ष द्या. नाईक, उठा, तो घोड्याचा चाबूक घ्या."

नाईक चाबूक घेऊन फटके मारण्यास तयार झाला, तों बुध्या म्हणाला, "नाईक, जरा थांबा. ह्या माशांच्या किंमतींत माझा एक वांटेकरी आहे. त्याला त्याचा अर्धा वांटा आधीं मिळाला पाहिजे." तें ऐकून कान्होजीरावांस फारच अचंबा वाटून ते म्हणाले, "काय म्हणतोस! दुनियेंत तुझ्यासारखा दुसराही एक वेडा पीर आहे काय! बरें बरें, असें आहे तर तुझ्या वांटेकऱ्याचें नांव काय तें सांग लवकर! म्हणजे त्याला आतांच आणवितों." त्याजवर बुध्यानें उत्तर दिलें, "सुभेदार साहेब,

त्याच्या शोधास कोठें दूर जाणें नको. तो तुमच्या देवडीवर सांपडेल. तो तुमचा पाहरेकरीच आहे. 'तुझ्या प्राप्तीचा अर्धा वांटा मला देशील, तर तुला आंत सोडीन,' ह्या अटीवर त्यानें मला आंत येऊं दिलें. तेव्हां त्याचा वांटा त्यास मिळाला पाहिजे." हें ऐकून सुभेदारांस अतिशय राग आला, आणि ते म्हणाले, "होय, त्याचा वांटा त्याला भरपूर दिला पाहिजे! नाईक, त्या लांचखाऊस आंत बोलावा!" पाहरेकरी आंत आल्यावर, आंग्र्यांनीं त्याच्या पाठीवर सर्वां समक्ष पन्नास फटके सडकून ओढविले, व त्यास कामावरून दूर केलें; आणि बुध्याच्या अक्कलेची तारीफ करून, त्यास चांगलें बक्षीस दिलें, व खुद्द आपल्या महागिरीवर त्याला नाइकाची आसामी दिली.

## २२. गर्वाचें घर खालीं.



एक बैल मस्त होऊन गर्वास चढला होता. त्याच्या नाकाजवळ एक डांस येऊन गुणगुण करून त्याला त्रास

देऊं लागला. त्याला तो बैल बोलतो, "अरे नीचा, एथून निघून जा. तुझी बिशात ती किती? पण, तुझ्या सारख्या हलकटावर हात टाकणें मला योग्य वाटत नाहीं. नाहीं तर तुला एका पळांत तमाशा दाखविला असता!"

तें बोलणें ऐकून घेऊन, डांस त्याला उत्तर करतो, "तूं मला इतका नीच समजूं नकोस. पाहिजे तर तुला आतांच चमत्कार दाखवितों." असें बोलून तो एकदम त्या बैलाच्या नाकांत शिरला, आणि तेथें त्यानें त्याला सडकून मोठा चावा घेतला. त्या सरशा बैलास फार वेदना होऊं लागल्या. त्यानें पुष्कळ हूं फूं केलें, इकडून तिकडे उड्या मारिल्या व तो खालीं मान घालून गरगर फिरूं लागला; तरी डांस बाहेर पडेना! अखेर बैलाचा जीव फार कासावीस होऊन तो भुईवर पडला, आणि हात पाय झाडूं लागला. अशी त्याची दुर्दशा झाली. तेव्हां तो डांस त्याच्या नाकावाहेर येऊन त्याला म्हणाला, "बैलोबा, आजपासून आपल्या बळाचा असा गर्व कधीं करूं नको बरें!"

ह्याप्रमाणें बैलाला बोलून डांस तेथून निघाला, तेव्हां तोही गर्वानें फुगून गेला. "एवढ्या मोठ्या बैलास मीं क्षणांत कसें घाबरें करून सोडिलें! मी किती पराक्रमी आहें!" असें गुणगुणत तो डांस डौलानें उडत चालला असतां, एका कोळ्याच्या जाळ्यांत सांपडला. जाळ्यांतून सुटून जाण्यासाठीं त्यानें पुष्कळ धडपड केली. पण जों जों धडपड अधिक, तों तों तो त्यांत अधिकच अडकत गेला. त्याचे हात पाय सगळे गुरफटले.

तें पाहून, त्यास धरण्यासाठीं टपून बसलेला कोळी तेथें धावून आला, आणि त्यानें त्याला ठार मारून खाऊन टाकिलें.

मनुष्य गर्वानें फुगतो तेव्हां त्याला असें वाटतें कीं, "माझ्या-पेक्षां मोठा कोणी नाहीं." पण तें मूर्खपण होय. जगांत शेराला सवाशेर असतोच, ह्याकरितां शाहाण्यानें कधीं गर्व करूं नये.

---

## २३. खरें बोलणारा मुलगा जार्ज वाशिंग्टन.

अमेरिका म्हणून एक मोठें खंड फार दूर आहे. तेथें जार्ज वाशिंग्टन नांवाचा एक थोर पुरुष होऊन गेला. तो सहा वर्षांचा असतां त्याला कोणीएकानें एक लहानशी कुऱ्हाड बक्षीस दिली. तिचा त्याला मोठा हर्ष झाला; आणि ती कशी चालते, हें पाहण्यासाठीं तो ती ज्यावर त्यावर हाणीत सुटला. असा फिरतां फिरतां सहज तो आपल्या घरा-शेजारच्या बागेंत गेला. तेथें त्याच्या बापाच्या आवडीचें एक फळझाड होतें, त्यावर आपली कुऱ्हाड चालवून त्याची साल त्यानें तासिली. त्यामुळें तें झाड जायबंदी झालें.

दुसरे दिवशीं त्याचा बाप बागेंत गेल्यावर, त्या झाडाची ती अवस्था पाहून त्याला अतिशय वाईट वाटलें. तो म्हणाला, "मला कोणीं शंभर रुपये दिले असते, तरी हें झाड मीं त्याला दिलें नसतें." झाडाची तशी दुर्दशा कोणीं केली ह्या-विषयीं तो आपल्या चाकरमाणसांत शोध करूं लागला. परंतु, तें कोणाला ठाऊक नव्हतें, त्यामुळें कांहींएक पत्ता लागेना.

इतक्यांत जार्ज हा ती कुऱ्हाड घेऊन, खेळत खेळत बागेंत



आला. त्याला बापानें विचारिलें, " काय रे जार्ज, ही झाडाची साल कोणीं तासिली, तें तुला ठाऊक आहे काय?" तें ऐकून जार्ज अमळ गोंधळला, आणि थोडा वेळ स्तब्ध राहून, मान खालीं घालून, बापास म्हणाला, "बाबा, माझ्यानें खोटें बोलवत नाहीं. मींच आपल्या कुऱ्हाडीनें हें झाड तासिलें." हे शब्द ऐकून बापास मोठा गहिंवर आला. त्यानें जार्ज ह्यास जवळ घेऊन त्याच्या पाठीवरून हात फिरविला, आणि म्हटलें, " मुला, कांहीं चिंता नाहीं! झाडाची बिशात काय? तूं खरें बोललास ह्यानें मला असलीं हजार झाडें मिळाल्याचा संतोष झाला आहे! रुप्याच्या पानांचीं आणि

सोन्याच्या फुलांचीं अशीं शेंकडों झाडें मिळण्यापेक्षां, हें तुझें खरें बोलणें मला अधिक मोलाचें वाटत आहे!"

हा मुलगा मोठा झाल्यावर आपल्या ह्या गुणानें, एक एक पायरी चढत चढत, आपल्या देशाचा मुख्य अधिकारी झाला. मुलांनो, "माझ्यानें खोटें बोलवत नाहीं," असें जार्ज हा जसें म्हणाला, तसें जर तुम्हां सर्वांच्यानें नेहमीं म्हणवेल, तर किती बरें चांगलें होईल!

जो मुलगा सर्वदा खरें बोलतो, आणि कोणास कधीं ठकवीत नाहीं, तो सगळ्या माणसांस आवडतो आणि देवासही आवडतो.

---

## २४. गुरुसेवा.

बगदाद एथें मामून नांवाचा एक मोठा वैभवशाली खलीफा होऊन गेला. तो स्वतां मोठा विद्वान् असून विद्वान् लोकांचा पुरस्कर्ता होता. त्यानें फर्रा नांवाच्या एका पंडितास आपल्या दोन मुलांना शिकविण्यासाठीं शिक्षक नेमिलें. एके दिवशीं फर्रा त्या मुलांना पाठ देत असतां कांहीं कामाकरितां आपल्या बैठकीवरून उठून बाहेर जाऊं लागला. तें पाहातांच दोघेही मुलगे आपल्या गुरूचे जोडे त्याच्यापुढें नेऊन ठेवण्यास धांवले. जोडे होते तेथें ते दोघेही एकाच वेळेस जाऊन पोहोंचले. प्रत्येकास गुरूचे जोडे गुरुपुढें नेऊन ठेवण्याची कामगिरी आपण एकट्यानेंच करावी असें वाटून, तसें करण्याकरितां ते एक-मेकांशीं झगडूं लागले. शेवटीं, प्रत्येकानें एक जोडा गुरुपुढें

नेऊन ठेवावा, असें त्या दोघां भावांनीं आपसांत ठरवून, त्याप्रमाणें त्यांनीं जोडे गुरूपुढें नेऊन ठेविले.

लौकरच ही गोष्ट चाकरांच्या द्वारें खलिफाच्या कानावर गेली. खलिफानें फर्रास बोलावून आणिलें व विचारिलें कीं, "आज पृथ्वींत सर्वांत श्रेष्ठ पुरुष कोण आहे?" फर्रानें उत्तर केलें, "जनाब, आपणाशिवाय दुसरा कोण श्रेष्ठ असणार?" मामून म्हणाला, "कां? ज्याचे जोडे खलिफाचे पुत्र उचलितात, तो मजहून श्रेष्ठ नाहीं काय?" फर्रानें उत्तर दिलें, "माझ्या जोड्यांस हात लावूं नका, असें मुलांस मी सांगणार होतों; परंतु पुन्हा मनांत विचार केला कीं, जर मीं त्यांच्या त्या शिष्टाचारास नको म्हटलें, तर कदाचित् त्यांना वाईट वळण लागेल, व त्याचा दोष मजवर येईल; म्हणून मीं त्यांस हरकत केली नाहीं." मामून म्हणाला, "गुरुजी, तुम्हीं जें केलें तें फार चांगलें केलें! तुम्हीं जर तसें केलें नसतें, तर त्याबद्दल मात्र मला वाईट वाटलें असतें. माझ्या मुलांनीं आपल्या गुरूचे जोडे उचलिले, ह्यांत त्यांचा विनय दिसून आला! देवाची, तशीच आईबापांची, गुरूची आणि राजाची सेवा केल्यानें कोणाच्या कुलीनपणास बट्टा येत नाहीं, किंवा कोणाचा अपमानही होत नाहीं." असें बोलून खलिफानें आपल्या मुलांस केलेल्या कामाबद्दल शाबासकी दिली, आणि त्यांच्या गुरूस मोठें इनाम दिलें.

---

## १८. खेळ.

इंद्रवज्रा आणि उपजाति.

केला रवीनें निजताप दूर,
वाहे हरावया श्रम हा समीर;
हें सृष्टि-सौंदर्य खुलें तुम्हांला
ठेवीतसे देव पहावयाला ॥ १ ॥

घेऊनि माथां फल-पुष्प-भार
द्याया तुम्हां तोष तरू तयार.
शाळेंतलें काम करून सारें
खेळावयालागिं निघा, चला रे ! ॥ २ ॥

खेळूं नका केवळ गंजिफांचे
ते खेळ गादीवर बैसण्याचे ;
त्या सोंगट्या भांडण लावितात,
होई न तत्संगति सौख्य-दाती ॥ ३ ॥

पळा, पळा ! कोण पुढें पळे तो
पाहूं बरें ! कोण थकून जातो;
कीं खेळ खेळा तुम्हि लंगडीचा,
चित्तास वाटे जरि तो मजेचा ॥ ४ ॥

गडी विभागा, अथवा, समान;
होऊनियां खुंट बसा जपून;
खो देउनीयां उठवा गड्याला,
अर्धे करा यत्न पळावयाला ॥ ५ ॥

कोर्डीत अर्धे, अथवा, चला या,
बाहेर अर्धेहि निघा पळाया,
घेऊनियां सूर धरा गड्याला;
ह्या सूरकोर्डी रमवा मनाला. ॥ ६ ॥

खेळांमधीं खेळ तथापि पाट्या,
व्यायाम देण्यास तयार मोठ्या,
साऱ्या गड्यांना श्रम सारखाच;
म्हणूनि खेळांमधिं खेळ हाच ! ॥ ७ ॥

बालत्व आहे वय वाढण्याचें,
स्नायूंस सामर्थ्य चढावयाचें;
तें खेळ देतात सुखें तुम्हांला;
खेळा तरी टाकुनि आळसाला. ॥ ८ ॥

मो० ग० लोंढे.

---

## २६. अपराधाची कबुली.

वामन आणि वेणू हीं उभयतां भावंडें एके दिवशीं दिवाणखान्यांत खेळत होतीं. तेथें एक आरसा ठेविला होता तो त्यांच्या लक्षांत आला नाहीं. खेळतां खेळतां वामनानें वेणूला सहज ढकलिलें, तों तिचा पाय आरशावर पडून तो फुटला तेव्हां वेणू म्हणाली, "दादा, केवढ्यानें रे मला धक्का दिलास ! तुझ्या धक्क्यानें माझा पाय आरशावर पडून तो फुटला ना ! आतां बाबा रागावले म्हणजे मी तुझें नांव सांगेन ! मी

म्हणेन, दादानें आरसा फोडिला; मजकडे कांहीं नाहीं."

वामन—वेणे, खोटें बोलूं नकोस! मी आरशाला शिवलों तरी? तूंच पाय देऊन नाहीं का हा फोडिलास?

वेणू—दादा, असलें कुभांडीपणाचें बोलणें बोलूं नकोस. तूं मला ढकलून दिलेंस, त्यामुळें ना माझा पाय आरशावर पडला? का तूं म्हणतोस तसा मीं त्याच्यावर मुद्दाम पाय दिला?

वामन—बरें, पण वेणू, आतां पुढें कसें करावें? बाबा रागावतील त्याची वाट काय?

वेणू—दुसरी वाट नाहीं; झालेला खरा मजकूर आपण बाबांना अगोदरच कळवूं म्हणजे झालें.

वामन—छे! आपण अगदीं बोलूं नये. आपण एथून बागेंत खेळावयास जाऊं, म्हणजे झालें. आरसा कोणीं फोडिला कोण जाणे!

वेणू—दादा, ही तुझी मसलत बरी नाहीं. खरें सांगणें हेंच उत्तम. त्यांत आपण एथें खेळत होतों हें सगळ्यांना ठाऊक आहे. तेव्हां आपणच आरसा फोडिला असें शेवटीं खरें ठरेल! पहिल्यानें नाकबूल होऊन मग कबूल व्हावें, त्यापेक्षां अगोदरच खरें सांगावें हें चांगलें नाहीं का?

वामन—बरें, पण बाबा घरीं येण्यापूर्वीं आपण आईकडे जाऊन तिच्या कानावर ही गोष्ट घालूं; म्हणजे ती बाबांचा राग कमी करील.

मग तीं उभयतां मुलें आईकडे गेलीं. आणि माना खालीं



घालून तिच्या शेजारीं मुकाट्यानें उभीं राहिलीं. बराच वेळ झाला तरी मुलें कांहीं बोलतना, तेव्हां आईनें त्यांस विचारिलें, "मुलांनो, तुम्ही बोलत कां नाहीं? काय झालें तुम्हांला?" आईच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच वेणूला रडण्याचा हुंदका आला, आणि वामनाचेंही तोंड गोरेंमोरें झालें. तें पाहून आई म्हणाली, "वेणे, कां ग रडतेस? वामन, काय रे झालें? काय झालें तें मला सांगा, अशीं रडूं नका."

तेव्हां वेणू रडें आवरून आईस म्हणाली, "आई, आज आम्हांपासून एक वाईट गोष्ट झाली. तूं रागावणार नाहींस तर सांगतें!" आई बोलली, "सांग बेटा, भिऊं नको." वेणू म्हणाली, "मघां दादा आणि मी दिवाणखान्यांत खेळत होतों. खेळतां खेळतां दादानें मला सहज ढकलिलें, तों माझा पाय तेथल्या आरशावर पडून आरसा फुटला. बाबांना हें समजलें म्हणजे ते आम्हांला बोलतील, म्हणून आम्हांला भय वाटतें."

वेणूचे हे शब्द ऐकून आईनें दोघांनाही पोटाशीं घट्ट धरिलें

आणि म्हटलें, "बाळांनो, भिऊं नका. तुम्हीं ह्या वेळीं आपला अपराध कबूल केला हें ठीक झालें. आतां तुम्हीं स्वस्थ असा. मी तुम्हांला बोल बसूं देत नाहीं. तुम्हीं अपराध नाकबूल केला असता, तर मात्र तुम्हांला रागें भरून घ्यावें लागलें असतें."

---

## २७. मुलींची शाळा.

आळंदीकर हरिबाबा वारवरे फारां दिवशीं पुण्यास आपल्या जुन्या मित्राकडे गेला होता. त्याचे मित्र विष्णुपंत भेने सुशिक्षित असून, त्यांचें लक्ष स्त्रीशिक्षणाकडे विशेष होतें. एके दिवशीं ते दोघे फिरतां फिरतां एका मुलींच्या शाळेवरून चालले. तेव्हां हरिबाबानें विचारिलें, "पंत, हें काय आहे?" विष्णुपंतांनीं उत्तर दिलें, "ही मुलींची शाळा आहे. चला आपण आंत जाऊं." हरिबाबा जुन्या समजुतीचा ब्राह्मण होता, तो म्हणाला, "कशाला पाहिजेत हो ह्या मुलींच्या शाळा? शिकून त्यांना का नोकऱ्या करावयाच्या आहेत?" विष्णुपंत बोलले, "चला तर खरें; मुलींना शाळा कशाला पाहिजेत ह्याबद्दल आपण मग बोलूं." नंतर ते दोघे शाळेंत गेले.

आंत जाऊन विष्णुपंतांनीं शाळा पाहण्याची आपली इच्छा हेड-मिस्ट्रेस, उमाबाई, ह्यांस कळविली. तेव्हां त्या त्यांस बरोबर घेऊन प्रत्येक वर्गामध्यें गेल्या. एका वर्गांत मुली सुस्वर गाणीं म्हणत होत्या. दुसरीकडे मुली शिवणकाम व कशीदा शिकत होत्या. त्यांनीं तयार केलेले परकर, चोळ्या, वगैरे कपडे व कशिद्याचे कांहीं नमुने उमाबाईंनीं त्यांना दाखविले. ते

८०११८



पाहून हरिबाबा विचारतो, "हे सर्व मुलींनींच तयार केले काय?" उमाबाई म्हणाल्या, "होय." नंतर उमाबाईंनीं त्यांना दुसऱ्या एका वर्गांत नेलें. तेथें कांहीं मुली पानांच्या व फुलांच्या आकृती काढीत होत्या, व कांहीं सुंदर रांगोळ्या काढीत होत्या. तें पाहून हरिबाबा फारच खूश झाला. नंतर ते गृह-व्यवस्थेचें शिक्षण चाललें होतें तिकडे गेले. तेथील मुली जाणत्या होत्या. त्यांची शिक्षकीण त्यांना दूधदुभत्यावर पाठ देत होती. तेव्हां हरिबाबा आश्चर्यानें म्हणतो, "वा! एथें हें देखील शिकवितात!" नंतर उमाबाईंनीं त्यांना शाळेंतील वस्तुसंग्रह दाखविला. तेव्हां हरिबाबानें विचारिलें, "ह्या वस्तूंचा उपयोग काय?" उमाबाई म्हणाल्या, "धडे समजावून देतांना, ह्या संग्रहांतील वस्तु मुलींना प्रत्यक्ष दाखवावयाच्या." असें म्हणून त्यांनीं वस्तुपाठ चालला होता त्या वर्गांत त्यांना नेलें. अशा रितीनें शाळेंतील सर्व व्यवस्था लक्षपूर्वक पाहून ते दोघे उमाबाईंचे आभार मानून निघाले.

बाहेर येतांच हरिबाबा म्हणाला, "पंत, शाळेंतील एकंदर व्यवस्था पाहून मला फार समाधान वाटलें. मला वाटत नव्हतें कीं, इतक्या चांगल्या रितीनें मुलींना शाळेंत शिकवितात! सगळ्या शाळेंत आपण फिरलों, पण कोठें गोंगाट, कीं भांडण, कीं अव्यवस्थितपणा,— असें कांहीं दिसलें नाहीं. मुली आपापल्या कामांत चूर असून, त्यांचें वर्तन किती मर्यादशील होतें! सर्व शिक्षकिणीही सुशील असून आपल्या कामांत फारच वाकबगार अशा दिसल्या. छे! विष्णुपंत, मी अगदीं

चुकत होतों. मुलांप्रमाणें मुलींच्याही शाळा असणें जरूर आहे. मी आपली मुलगी तुमच्या घरीं आणून ठेवितों. तुमच्या मनीबरोबर ती शाळेंत जाईल. "

---

## २८. मुंग्यांची दूरदृष्टि.

एका माळ्याच्या बागेंत मुंग्यांचें एक वारूळ होतें. त्यांत पुष्कळ मुंग्या राहात होत्या. पावसाळा संपल्यावर पुढील आठ महिन्यांत त्या दररोज सूर्य उगवल्यापासून सूर्य मावळेपर्यंत एकसारख्या खपून, धान्याचा संग्रह करीत असत.

त्या वारुळाजवळच फुलझाडांचा एक मोठा ताटवा होता. त्यावर, उन्हाळ्यामध्यें, हजारों माशा येऊन बसत; एका फुलावरून दुसऱ्या फुलावर व दुसऱ्यावरून तिसऱ्यावर अशा उड्या मारीत; मध पीत; आणि सगळा वेळ मौजेंत घालवीत.

त्या माळ्याला एक लहान मुलगा होता. तो स्वभावानें मोठा चौकस होता. मुंग्यांची वागणूक तो नेहमीं लक्ष देऊन पाहात असे. एके दिवशीं, त्या ताटव्याजवळ बसला असतां, तो बापास म्हणाला, "बाबा, मला वाटतें, त्या मुंग्यांपेक्षां ह्या माशा फार शाहाण्या आहेत. ह्या पाहा कशा मजा मारीत आहेत! ह्या खातात, पितात व चैन करितात. नाहीं तर त्या मुंग्या! मूर्ख वेड्या! नेहमीं काम, काम, काम!" त्या वेळीं माळ्यानें कांहींएक उत्तर दिलें नाहीं.

पुढें पावसाळा आला. ढग आले. वारा सुटला. पाऊस पडूं लागला. हवा थंड झाली. तेव्हां ते बापलेक पुन्हा बागेंत

गेले असतां, त्या वारुळाजवळ एकही मुंगी त्यांच्या दृष्टीस पडली नाहीं; परंतु त्याच्या आसपास, त्या ताटव्याच्या भोंवतीं, शेंकडों माशा मरून पडलेल्या त्यांना दिसल्या. त्याचें नवल वाटून, मुलगा म्हणाला, “ बाबा, मागें इतक्या मुंग्या होत्या, त्या काय झाल्या हो ? आतां एक देखील कोठें दिसत नाहीं ! ह्या माशा बघा मरून पडल्या आहेत, पण मुंग्यांचें काय झालें ? ”

बाप—बाळा, मुंग्या बाहेर कोठें दिसत नाहींत, पण त्या आपल्या वारुळांत खुशाल आहेत.

मुलगा—काय, खुशाल आहेत ?

बाप—होय, खुशाल आहेत; त्यांनीं राहण्याकरितां आपणांस वारूळ बांधून ठेविलें आहे, आणि आठ महिने श्रम करून पावसाळ्या करितां अन्नाची बेगमीही करून ठेविली आहे.

मुलगा—तर मग, माशांपेक्षां मुंग्या पुष्कळ शाहाण्या आहेत !

बाप—होय, बाळा. मुंग्या फार दूरदर्शी आहेत ! मागें तूं मुंग्यांना वेड्या म्हणत होतास ना ?

मुलगा—होय, बाबा. पण ती माझी चुकी होती. त्यांनीं पुढील तरतूद करून ठेविली, म्हणून त्या आतां खुशाल आहेत. त्याच शाहाण्या खऱ्या. ह्या माशा उन्हाळाभर उनाडल्या, खेळल्या, खिदळल्या; त्यांनीं घर बांधिलें नाहीं किंवा अन्नाचा सांठा केला नाहीं; म्हणून त्या आतां मरून पडल्या आहेत.

---

## २९. पाणपोई.

पाणपोई म्हणजे गरीबगुरीब लोकांस रस्त्यावर पाणी प्यावयास मिळण्याची सोय केलेली असते, ती होय. थंडगार पाण्याचे रांजण भरलेले असतात, आणि जवळ कळकाचें नळकंडें किंवा पन्हळी खांबल्यांवर ठेविलेली असते. तिच्या आंत वरच्या टोंकास पाणी ओतितात, तें तिच्या खालच्या टोंकाशीं येऊन पडतें. तेथें तें, भारेवाले, मोळीवाले, गाडीवान, मजूर, असे गरीब लोक आपल्या हातांच्या ओंजळी करून पीत असतात.

अशी एक पाणपोई मागें कल्याण शहरीं होती. तेथें, दुपारच्या वेळीं, गरीब लोक पाणी पीत होते. त्या दिवशीं गोविंदराव, आपला भाचा रामा, ह्यास घेऊन बाजारांत जावयास निघाले असतां, त्या पाणपोईजवळ आले. तेव्हां रामानें विचारिलें, "मामा, हे कोण लोक हो? हे असे भिकाऱ्यांसारखे रस्त्यावर बसून कळकाच्या नळकंड्यांतून कां पाणी पीत आहेत? ह्यांना घरेंदारें नाहींत काय?"

गोविंदराव—रामा, ह्यांना घरेंदारें नाहींत, असें नाहीं. पण पोटाकरितां ह्यांना सकाळपासून संध्याकाळपर्यंत बाहेर खपावें लागतें; मोठमोठीं ओझीं वाहावीं लागतात; प्रहरांचे प्रहर उन्हांत काम करावें लागतें; खालीं पाय चटचटां भाजत असतात; आंगांतून घामाच्या धारा चालल्या असतात; घशाला कोरड पडते, आणि जीव अगदीं कासावीस होतो. अशा वेळीं पाणी पिण्यास त्यांनीं घरीं कसें जावें? त्यांच्यासाठीं अशा पाणी पिण्याच्या

सोई श्रीमंत व दयाळू लोक धर्मबुद्धीनें करून ठेवितात. त्यांचा उपयोग त्यांस फार होतो. तो ओझेवाला पाहा कसा घटाघटा पाणी पीत आहे! तो पलीकडचा मोळीवाला पाणी पिऊन, कपाळावरचा घाम निपटीत व हुश्श करीत कसा बसला आहे पाहा! हें पाणी ह्या लोकांस मिळाल्यानें त्यांच्या जिवास बरें वाटतें, नवी हुशारी येते, आणि ते पुन्हा हौसेनें आपापल्या कामास लागतात.

रामा—हे लोक पाणपोई घालणाऱ्यांस फार दुवा देत असतील, नाहीं बरें!

गोविंदराव—हें काय विचारतोस? पोट भरलें म्हणजे ढेंकर यावयाचीच; अंतरात्मा तृप्त झाला कीं तोंडानें दुवा यावयाचाच!

रामा—ही गोष्ट लहानशी वाटते, पण तिचा उपयोग फार मोठा आहे. तो पहिल्यानेंच लक्षांत येत नाहीं.

गोविंदराव—अशा गोष्टी जगांत पुष्कळ आहेत कीं, त्या कांहीं लोकांना अगदीं क्षुल्लक वाटतात; पण त्याच इतर कांहीं लोकांस फार मोठ्या वाटतात. श्रीमंतांस पाणपोई म्हणजे कांहींच वाटत नसेल; परंतु, ह्या गरीब लोकांस तिचा किती मोठा उपयोग आहे? ह्यासाठीं चांगली गोष्ट लहान असो का मोठी असो, करतां येईल ती आपण करावी. त्यांतच खरें मोठेपण आहे.

## २०. मनोराज्य.

शेख महंमद म्हणून एक मोठा आळशी माणूस होता. त्यानें, बाप जिवंत असतां, कांहीं एक कामधंदा केला नाहीं. सगळा वेळ खाण्यापिण्यांत व इकडेतिकडे भटकण्यांत घालविला. पुढें त्याचा बाप वारला तेव्हां त्यानें आपल्या मुलाला शंभर रुपये मागें ठेविले.

ह्या शंभर रुपयांचा व्यापार करून पुष्कळ नफा मिळवावा, म्हणून शेख महंमदानें त्या रकमेचे शिसे, कुप्या, बरण्या, पेले, इत्यादि नामी नामी कांचेचीं आणि मातीचीं भांडीं खरीद केलीं. तीं त्यानें एका मोठ्या हाऱ्यांत ठेविलीं, आणि तो हारा एका लहानशा दुकानांत मांडून, गिऱ्हाइकांची वाट पाहात तो तेथें भिंतीस टेकून बसला.

अशा प्रकारें तो बसला असतां, त्याच्या मनांत एकामागून एक विचार येऊं लागले. तो आपणाशीं म्हणाला, "हीं भांडीं घाऊक खरेदीनें शंभरांस घेतलीं आहेत. हीं फुटकळ विकून मी ह्यांचे दोनशें करीन. त्या दोनशांचे चारशें व्हावयाला उशीर लागावयाचा नाहीं. असें होतां होतां, कांहीं वेळानें चारशांचे चार हजार अगदीं सहज होतील, आणखी मग त्यांचे दहा हजार होण्यासही फार अवकाश लागणार नाहीं. असा मी दहा हजारांचा धनी झालों, म्हणजे मी जवाहिऱ्या होईन, आणि हिरे, माणकें, मोतीं, वगैरे रत्नांचा व्यापार करीन. त्यांत मला खूप पैसा मिळेल. मग मी एक मोठा वाडा विकत घेईन. शेतवाडी, जमीनजुमला खरीद करीन. गाड्या,

घोडे, चाकर, कारभारी ठेवीन व लोकांत नांव मिळवीन. पुढें तसाच धंदा चालवून, लाख दोन लाख रुपये माझ्या संग्रहीं राहिल्यावर मी मोठा सरदार होईन. मग एकाद्या उमरावाच्या मुलीशीं मी लग्न करीन. ती घरीं आली म्हणजे मजशीं मोठ्या अदबीनें वागेल, असें करीन. तिजपाशीं मी फारसा बोलणार नाहीं. तिनें आपल्या खोलीबाहेर सहसा पडूं नये असें करीन. मग कांहीं कारणावरून मी तिजवर रुसल्यासारखें करीन. तेव्हां तिच्या दासीबटकी माझ्यापुढें हात जोडून, पदर पसरून, माझी समजाविशी करूं लागतील. तरी मी त्यांचें ऐकणार नाहीं. तेव्हां तिची आई, आपल्या मुलीला बरोबर घेऊन, मी गादीवर बसलों असेन, तेथें येईल. नंतर माझी बायको, डोळ्यांत असवें आणून, मला समजाविण्याकरितां, माझ्या पायां पडूं लागेल. तेव्हां तिला माझा मोठा दरारा वाटावा म्हणून, ती कांहीं अंतरावर जाऊन धडपडून पडे, अशी झटक्याची लात मी तिला मारीन."




शेख महंमद अशा विचारांत इतका गढून गेला होता कीं,

लात मारण्याचें नुसतें त्याच्या मनांत येऊनच राहिलें असें नाहीं; तर, त्याप्रमाणें त्याच्या पायाची उचल होऊन, त्याची ती झटक्याची लात त्या हाऱ्यास मोठ्या जोरानें लागून, तिच्या तडाक्यासरशीं तीं सगळीं भांडीं फुटून त्यांचे तुकडे तुकडे झाले!

अशा प्रकारें त्या बिचाऱ्याच्या सर्व आशांचा भंग होऊन त्यास उपासमर प्राप्त झाली!

---

## ३१. फिरून यत्न करून पाहा.

एके दिवशीं छोटा लखू आपला पतंग उडवीत होता; पण तो कांहीं केल्या उडेना. तेव्हां लखू आपला भाऊ, रामा, ह्यास म्हणाला, "भाऊ, माझा एवढा पतंग उडवायाला येतोस का? आलास तर बरें होईल!" तें ऐकून रामानें तो पतंग उचलून वर उडविला. पण लखू त्यासरसा धावावयास लागला नाहीं, त्यामुळें तो पतंग भुईवर पडला. तें पाहून लखू म्हणतो, "भाऊ, तूं चांगला



झोका नाहीं दिलास, त्यामुळें असें झालें."

रामा म्हणाला, "ह्यांत माझ्याकडे कांहीं नाहीं. सगळी

चुकी तुझीच आहे." त्यांचा चुलता जवळच होता, तो त्यांस म्हणाला, "कांहीं चिंता नाहीं. फिरून यत्न करून पाहा."

त्याप्रमाणें रामानें पुन्हा एकदां पतंग उचलून वर उडविला. पण उडविण्याच्या आधींच लखू पळूं लागला, त्यामुळें तो पतंग पुन्हा वेडावांकडा होऊन भुईवर पडला. तेव्हां रामा म्हणतो, "कां लखू, आतां तरी कोण चुकला ?"

चुलता म्हणाला, "कांहीं चिंता नाहीं. फिरून यत्न करून पाहा". तेव्हां रामानें पुन्हा पतंग उचलून वर उडविला. पण इतक्यांत एकाएकीं आडवा वारा येऊन, त्यासरसा पतंग वाहात जाऊन एका झुडपास अडकला, व त्याचें शेपूट त्या झुडपांत गुंतून तो तेथें उलटा लोंबूं लागला. तेव्हां लखू म्हणतो, "बघ, तूं झोका भलतीकडे दिलास, त्याचें हें फळ!" रामानें उत्तर केलें, "अरे, पण वारा माझ्या हातचा आहे का ?"

ह्या वेळीं चुलता पुढें सरून त्या मुलांच्या मदतीस गेला. त्यानें ती शेपटाची गुंतागुंत सोडविली, आणि मुलांस म्हटलें, "मुलांनो, ही जागा चांगली नाहीं. पतंग उडविण्यास उघडें मैदान पाहिजे. चला, आपण त्या पलीकडच्या माळावर जाऊं, आणि मग तेथें तुम्ही फिरून यत्न करा."

त्याप्रमाणें ते माळावर गेले. मग सगळी तयारी बरोबर झाली, तेव्हां लखू दोरी धरून धावूं लागला, व त्यासरसा चुलत्यानें तो पतंग वर उडविला. तो एकाद्या विमानासारखा वर वर चालला, आणि मनस्वी ओढ घेऊं लागला. पतंगाची

लखूला मोठी मौज वाटली, आणि ती पाहण्याकरितां तो वर बघत राहिला. पण इकडे दोरी ढिली पडली, व पतंग गोते खाऊं लागला; आणि पुन्हा वारा चांगलासा नसल्या-मुळें तो भुईवर आला. तेव्हां चुलता म्हणाला, "अरे लखू, तूं असें थांबायाचें नव्हतेंस. बरें असो. फिरून यत्न करून पाहूं."

लखू थोडासा फुरंगुटून म्हणाला, "आतां नाहीं मी फिरून यत्न करून पाहणार! पतंग नीट उडत नाहीं कांहीं नाहीं! मग कशाला हा त्रास करा?"

चुलता म्हणाला, "छी, छी! लखू, असें काय वेड्या-सारखें बोलतोस! इतके श्रम करून आतां हा खेळ तसाच सोडावयाचा? अरे, दोन तीनदां खटपट फुकट गेली म्हणून काय झालें? तेवढ्यानें निराश होऊन हातपाय का गाळावे? छी! तुझी दोरी मीं गुंडाळिली आहे. चला, फिरून यत्न करून पाहा."

त्याप्रमाणें त्यांनीं फिरून यत्न केला, तो अगदीं उत्तम प्रकारें सिद्धीस गेला. एकाद्या बारीक पिसासारखा तो पतंग भर्रदिशीं वर गेला, आणि आकाशांत लहानशा ठिपक्यासारखा दिसूं लागला. तेव्हां हातांत दोरीच्या शेवटाची काठी धरून, लखू त्याजकडे मोठ्या हर्षानें टक लावून पाहूं लागला. तो म्हणाला, "काका, काका, हा बघा किती उंच गेला आहे तो! आणि त्यानें ओढ एवढी घेतली आहे कीं, ही काठी माझ्यानें हातांत धरवत देखील नाहीं. आणखी शें पन्नास वांवा दोरी असती, तरी ती देखील सरली असती!"

बराच वेळ डोळेभर मौज पाहिल्यावर लखूनें दोरी हळू हळू गुंडाळिली, आणि पतंग खालीं पडल्यावर तो हातांत घेऊन पाहून म्हटलें, " हा फार छान उडाला, आणि कोठें इतका देखील फाटला नाहीं ! काका, उद्यां आमचे अभ्यास झाल्यावर असेच आम्हीं पतंग उडविण्यास एथें येऊं का ? "

चुलता म्हणाला, " पाऊस नसेल तर खुशाल या. "

---

## ३२. देवाची प्रार्थना.

भुजंगप्रयात.

नमो[१] देवराया. नमो ज्ञानसिंधो[२].
नमो दीननाथा[३]. नमो दीनबंधो.
नमो विश्वकर्त्या[४]. नमो विश्वपाळा[५].
नमो मायबापा, कृपाळा, नृपाळा[६]. ॥ १ ॥

कामदा.

आस[७] ही तुझी फार लागली; दे, दयानिधे[८], बुद्धि चांगली.
देउं तूं नको दुष्ट[९] वासना[१०]. तूंच आवरीं[११] आमुच्या मना. ॥ १ ॥
वागवावया[१२] सर्व सृष्टिला[१३] शक्ति[१४] ही[१५] असे एक तूजला.
सर्वशक्ति[१६] तूं सर्व-देखणा[१७]. कोण जाणतो[१८] तूझिया गुण ? ॥ २ ॥
माणसें अम्ही सर्व लेकरें, मायबाप तूं, हें असे खरें.
तूझिया कृपेवीण, ईश्वरा, आसरा[१९] अम्हां नाहिं दूसरा. ॥ ३ ॥

दिंडी.

कृपासागर[२०] तूं अससि जगन्नाथा,
नम्र करितों[२१] तूझिया पदीं माथा.

असों आम्ही अति[२२]-पतित दुराचारी[२३],
तूंच होउनि, बा, सदय[२४], अम्हां तारीं[२५] ॥ १ ॥

साकी.

क्षणोक्षणीं अपराध करितसों, त्यांची गणती नाहीं;
काय करावें क्षमा न करशिल तरि मग ह्या दीनांहीं? ॥१॥
चुकलों बहु, तरि देवा, अमुचा नच अंव्हेर[२६] करावा;
क्षमा करावी, दीनवत्सला[२७], चित्तीं लोभ[२८] धरावा. ॥ २ ॥

कामदा.

असासि तूंच, बा, आसरा अम्हां, देइं आमुतें बुद्धि उत्तमा[२९].
जोडुनी करां प्रार्थितों तुला, दावि आमुतें मार्ग[३०] चांगला ॥ १ ॥

---

## ३३. संगतीचा परिणाम.



मागें अवंती नगरींत विक्रमराजा राज्य करीत असतां, एकदां एका फासे-पारध्यानें पोपटाचीं दोन लहान लहान पिलें

पकडून विकण्याकरितां आणिलीं. त्यांतील एक पिलूं विद्याधर पंडित नांवाच्या ब्राह्मणानें घेतलें. विद्याधर पंडित सुविचारी व सदाचारी ब्राह्मण होता. दुसरें पिलूं जीवारी नांवाच्या भिल्लाच्या घरीं पडलें. जीवारी अविचारी व वाईट चालीचा मनुष्य होता. विद्याधर पंडिताच्या घरचें पिलूं, तेथील वळण चांगलें असल्यामुळें, गोड बोलावयास व आल्यागेल्यांचा आदर-सत्कार करावयास शिकलें. पण जीवारीच्या घरचें वर्तन दुराचाराचें असल्यामुळें, व पिलाच्या कानावर नेहमीं शिवीगाळ पडत असल्यामुळें, तें आल्यागेल्यांचा तिरस्कार करण्यास व त्यांस शिव्या देण्यास शिकलें.

एके दिवशीं राजा विक्रम वेश पालटून नगरांत फिरावयास निघाला असतां, त्या भिल्लाच्या घरीं आला. त्या वेळीं राजाला पाहतांच, “कोण रे तूं? लुच्चा कोठला! चालता हो एथून, नाहीं तर मार खाशील!” असें तो पोपट नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें शिव्या देऊन बोलूं लागला. तें ऐकून राजा चकित होऊन कांहीं न बोलतां परत चालता झाला.

बराच पुढें गेल्यावर त्याला विद्याधर पंडिताचें घर लागलें. राजा दारांत शिरला, तों तेथेंही त्यानें पोपटाचा पिंजरा पाहिला. राजाला पाहतांच पिंजऱ्यांतील पोपट नाचूं लागून, “यावें महाराज! बसावें. खुशाल आहां ना? पाणी पाहिजे काय?” असें बोलूं लागला. तें ऐकून राजास आनंद होऊन, तो आश्चर्य करीत तेथून चालता झाला.

राजाला त्या दोन पोपटांचें राहून राहून नवल वाटूं लागलें.

तेव्हां त्यानें आपल्या प्रधानास बोलावून आणिलें; आणि त्याला ती हकिकत सांगून, त्या दोन पोपटांमध्यें इतकें अंतर असण्याचें कारण काय, म्हणून विचारिलें. प्रधानानें चौकशी करून कळविलें कीं, "महाराजांस प्रथम आढळलेला पोपट एका वाईट चालीच्या भांडखोर भिल्लाच्या घरीं वाढला आहे. त्या पोपटाच्या कानावर नेहमीं शिवीगाळीचे व माराहाणीचे शब्द पडत असल्यामुळें, तो शिव्या देण्यास शिकला. दुसरा पोपट एका संभावित व आचारवंत गृहस्थाच्या घरीं वाढत असल्यामुळें, त्याला तसें चांगलें वळण लागलें."

तें ऐकून राजा आश्चर्यानें म्हणाला, "अजाण पाखरामध्येंही संगतीमुळें केवढा हा फरक पडला! मग माणसांची काय कथा?"

---

## ३४. लावी पक्षीण आणि तिचीं पिलें.

एक लावी पक्षीण एका शेतांत घरटें करून राहात होती. तिला तेथें पिलें झालीं; आणि तितक्यांतच तें शेत पिकून कापणीस आलें. तेव्हां तिला अशी काळजी पडली कीं, पिलांना पंख फुटण्याच्या आधीं जर शेत कापिलें, तर त्यांची गत काय होईल? म्हणून ती बाहेर जातांना आपल्या पिलांस सांगे कीं, मी बाहेर गेल्यावर, मागें कोण काय बोलतील, तें सगळें मला कळवा.

पुढें लवकरच एके दिवशीं शेताचा धनी तेथें येऊन आपल्या मुलांस म्हणाला, "अरे, आतां हें शेत कापिलें पाहिजे. तें कापण्यास उद्यां आपल्या इष्टमित्रांस आणि शेजाऱ्यापाजाऱ्यांस बोलावा."

तें बोलणें संध्याकाळीं पिलांनीं आपल्या आईस सांगितलें, आणि, " आतां आम्हांला लवकर कोठें तरी दुसरीकडे नेऊन ठेव," असें तीं म्हणूं लागलीं. त्यांस तिनें उत्तर दिलें, "मुलांनो, स्वस्थ असा; भिऊं नका. शेताच्या कापणीस शेताच्या धन्यानें शेजारीपाजारी आणि इष्टमित्र ह्यांस बोलाविलें आहे, पण ते कोणी येत नाहींत, आणि कापणी होत नाहीं. "

दुसऱ्या दिवशीं बाहेर निघतांना तिनें आपल्या पिलांस आदल्या दिवसाप्रमाणेंच सांगून ठेविलें. त्याप्रमाणें शेताचा धनी काय बोलतो तें ऐकण्यास तीं अगदीं टपून बसलीं. इतक्यांत तो शेताचा धनी येऊन शेतावर शेजाऱ्यांची आणि इष्टमित्रांची वाट पाहात बसला; परंतु कोणी आलें नाहीं. तेव्हां तो आपल्या मुलांस म्हणाला, " इष्टमित्रांवर आणि शेजाऱ्यांवर विश्वास ठेवण्यांत कांहीं अर्थ नाहीं, तर तुम्ही उद्यां आपल्या सोयऱ्यांस कापणीस बोलावा. ते खचीत येतील." तें ऐकून पिलें भ्यालीं, आणि आई येतांच त्यांनीं तें सगळें वर्तमान तिला सांगितलें. तेव्हां ती त्यांस धीर देऊन म्हणाली, " इतकेंच जर आहे, तर अजूनही कांहीं धास्ती नाहीं. शेजाऱ्या-पाजाऱ्यांची जी वाट, तीच सोयऱ्याधायऱ्यांची! त्यांना तरी धन्यासारखी कळकळ कोठून असणार? उद्यां कोणी येत नाहीं, आणि कापणी होत नाहीं. उद्यां आणखी काय बोलतील, तें असेंच नीट ऐकून मला सांगा. "

तिसऱ्या दिवशीं शेताचा धनी आला, पण सोयरेधायरे कोणी आले नाहींत. तेव्हां कांहींसा रागास येऊन, मोठ्या

निश्चयानें तो आपल्या मुलांस म्हणाला, "अरे, असें हें दुसऱ्यांवर टेकून राहणें बरें नाहीं. आपली आपणच कंबर बांधिली पाहिजे. उद्यां आपले विळे चांगले पाजवून आणा, आपणच सगळी कापणी करून टाकूं." हें सारें वर्तमान सायंकाळीं त्या पिलांनीं आपल्या आईस सांगितलें, तें ऐकून ती म्हणाली, "मुलांनो, आतां मात्र एथून गेलें पाहिजे. उद्यां कापणी खचीत खचीत होईल; कां कीं, ती तो शेतकरी स्वतां आपण करणार आहे. मनुष्य आंगीं काम करावयास निघाला, म्हणजे मग तें सहसा मागें पडत नाहीं." लागलींच तिनें आपलीं पिलें तेथून काढून दुसऱ्या जागीं नेलीं; आणि दुसऱ्याच दिवशीं त्या शेतकऱ्यानें व त्याच्या मुलांनीं आपलें शेत कापिलें.

---

## ३९. घराची स्वच्छता.

एके दिवशीं कमलाबाई ही आपली मैत्रीण विमलाबाई हिला भेटावयास गेली. बोलतां बोलतां कमलाबाई म्हणाली, "बाई, आज सहा महिने आमच्या घरची बहुतेक मंडळी आजारी आहे. नेहमीं आमच्या घरीं कोणी ना कोणी दुखणेकरी आहेच. ह्याचें कारण काय असावें बरें?"

विमलाबाई—खरें सांगूं का? पण तुम्ही रागावणार नाहीं, तर सांगतें. तुमचें घर इतकें घाणेरडें आहे कीं, त्यांत पाय ठेवण्यास सुद्धां माझें मन घेत नाहीं!

कमलाबाई—तर मग परवां उभ्यां उभ्यां माझ्याशीं बोलून तुम्ही लगेच चालत्या झालां, त्याचें हेंच का कारण?

विमलाबाई—होय. तुमचें घर घाणेरडें असतें, म्हणून तेथें दुखणीं उत्पन्न होतात. घाणीनें हवा बिघडते. अशा बिघडलेल्या हवेंत श्वासोच्छ्वास केल्यानें रोग होण्याचा फार संभव असतो. शरीर निरोगी राहण्यास शुद्ध हवा फार आवश्यक आहे.

कमलाबाई—प्रकृति बिघडण्यासारखें असें काय आमच्या घरीं तुम्हांला आढळलें ?

विमलाबाई—मीं पुष्कळदां पाहिलें आहे, तुमच्या घरांत जिकडे तिकडे केर व कोळिष्टकें भरलेलीं असतात. त्यांत रोगाचे अगदीं बारीक जंतु उत्पन्न होतात. ते जंतु श्वासावाटे शरिरांत जातात, व त्यामुळें रोग होतो. आम्ही आमच्या घरांत थोडासुद्धां केर सांचूं देत नाहीं. आम्ही कोनाकोपऱ्यांतून, आणि बैठकीखालून सुद्धां, वरचेवर केर काढितों. श्वासोच्छ्वास करतांना जी हवा आपण बाहेर सोडितों, तीसुद्धां अपायकारक आहे. तिच्या योगानें घरांतील हवा खराब होते. तुम्ही वाऱ्याच्या भीतीनें दारें व खिडक्या बंद करून ठेवितां, म्हणून घरांतील दूषित हवा बाहेर जात नाहीं, व बाहेरील स्वच्छ हवा घरांत येत नाहीं. आम्ही आपल्या घराचीं दारें व खिडक्या खुल्या ठेवितों, त्यामुळें ताजी हवा आंत येऊन बिघडलेली हवा शुद्ध होते. तुमचे बिछाने व बैठका तरी किती घाणेरड्या दिसतात! त्यांना तुम्ही कधीं उन्हांत पसरून ठेवीत नाहींसें दिसतें. आमचा प्रकार ह्याच्या उलट आहे. आम्ही आपल्या घरांत ऊन येऊं देतों, त्यामुळें रोगाचे जंतु मरतात, हवा शुद्ध होते व आलसरपणा नाहींसा होतो. आमचे बिछाने व बैठका

आम्ही वरचेवर उन्हांत वाळवून, काठीनें झोडपून, स्वच्छ करितों. खेरीज, तुम्ही आपल्या घरानजीक खड्डे करून त्यांत घाणेरें पाणी सांचूं देतां. तुमच्या एथें विहीर व पाण्याचा नळ ह्यांच्या जवळही पाणी सांचलेलें दिसतें. तें पाणी जमिनींत मुरतें, व त्यापासून उत्पन्न झालेल्या ओलीमुळें चिलटें होऊन हिंवताप वगैरे रोग उत्पन्न होतात.

कमलाबाई—हें मात्र, बाई, खरें सांगितलेंत. आमच्या घरांत चिलटें फारच असतात.

विमलाबाई—हीं चिलटें हिंवताप उत्पन्न करून, त्याचे जंतु एका माणसाच्या आंगांतून दुसऱ्या माणसाच्या आंगांत घालतात, हें तुम्हांला माहीत नाहीं काय? तुमच्या एथल्या मोऱ्या, मुत्र्या व शौचकूप स्वच्छ नसतात; त्यामुळेंही हवा बिघडते. आम्ही पाणी घालून त्या जागा साफ करितों, व कधीं कधीं त्यांवर राख किंवा माती टाकितों. असें केल्यानें अस्वच्छपणा व दुर्गंध नाहींसा होतो. तुम्ही जर आमच्याप्रमाणें ह्या सर्व गोष्टी कराल, तर सुमारें एक महिन्यांत तुम्हां सर्वांच्या प्रकृति सुधारतील, अशी माझी खातरी आहे.

कमलाबाई—मला आतां तुमचा आशय चांगला समजला. आमच्याच चुक्यांमुळें आम्हांला दुखणीं येतात, दुसरें कांहीं कारण नाहीं. तुम्हीं इतक्या स्पष्टपणें आमच्या चुक्या आज माझ्या नजरेस आणून सुखाचा मार्ग मला दाखविला, हा तुमचा माझ्यावर मोठा उपकार आहे.

---

## ३६. द्रौपदी आणि सत्यभामा.



पांडव वनवासांत दिवस कंठीत होते. त्यांचा समाचार घ्यावा म्हणून त्यांचा मित्र व मामेभाऊ जो श्रीकृष्ण, तो त्यांजकडे गेला. बरोबर त्यानें आपली स्त्री, सत्यभामा, हिलाही नेलें होतें. समाचार घेऊन परत जाण्याच्या वेळीं बोलतां बोलतां भामा द्रौपदीस विचारते, "काय ग द्रौपदी, आज मी तीन दिवस पाहतें, तों तुमच्या घरीं सर्व गोष्टी सुखासमाधानानें होतात. तुझी व तुझ्या पतींची बोलाचाली किंवा रुसवारुसवी कधीं होत नाहीं, आणि ते तुझ्यावर कधीं रागावत नाहींत; फार तर काय, पण ते तुझ्या अगदीं मुठींत आहेत असें दिसतें! तूं म्हणशील तें त्यांना मान्य! असा कोणता मंत्र किंवा औषधी तुझ्यापाशीं आहे कीं, त्यांना तूं असें स्वाधीन ठेविलें आहेस?"

द्रौपदी–सत्यभामे, तूं वेडी तर नाहींस! मंत्रतंत्रानें का पति स्वाधीन होत असतात? नाहीं हो. असला विचारसुद्धां मनांत आणूं नको. मंत्रतंत्र, औषधी, मुळ्या ह्यांच्या नादीं लागून, पुष्कळ वेड्या बायकांनीं आपल्या नवऱ्यांच्या जिवास अपाय करून घेतला आहे. तूं असल्या नादाला अगदीं लागूं नको.

सत्यभामा–काय म्हणतेस, मंत्रतंत्र, औषधी, कांहीं नाहीं? तर मग कोणत्या उपायानें तूं पतींना इतके स्वाधीन करून ठेविलें आहेस?

द्रौपदी–भामे, सांगतें ऐक. पतींस देवासारखे मानून ते संतुष्ट राहतील अशा रितीनें मी नेहमीं वागत असतें. मी त्यांजवर कधीं रुसत नाहीं कीं कधीं रागावत नाहीं. ते बाहेरून आले असतां, त्यांचा योग्य आदर करून, त्यांस समाधान वाटेल असें मी मधुर भाषण करितें. मी कोणत्याही गोष्टीबद्दल कधीं हट्ट घेऊन बसत नाहीं; नेहमीं संतुष्ट असतें. पतींच्या वाइटावर असणाऱ्या माणसांकडे मी कधीं ढुंकून पाहात नाहीं, मग त्यांच्याशीं, भाषण कोठलें? सगळा वेळ मी दक्षतेनें गृहकृत्यें चालवीत असतें. कोणत्याही पदार्थाची हयगय किंवा नास मी करीत नाहीं. खर्चिलेल्या द्रव्याचा हिशेब ठेवून चाकरमाणसांवर मी नजर ठेवितें. घर व भोंवतालची जागा नेहमीं स्वच्छ राखितें. बाई, आपण कष्ट सोसले, तरच दुसऱ्यापासून आपणांस सुख होतें. भलतें बोलणें, भलत्या ठिकाणीं बसणें, भलतीकडे जाणें, दारांत वरच्यावर उभें राहणें, अशीं कृत्यें न करण्याविषयीं मी जपत असतें. वाईट बायकांच्या वाऱ्यास देखील मी उभी राहात नाहीं;

कुलीन, सदाचरणी स्त्रियांशीं मात्र माझें संभाषण होतें. पतींची गुप्त गोष्ट मी कधीं फोडीत नाहीं. दीवस असो, रात्र असो, पतींना भूक, तहान लागल्याची चौकशी ठेवून, ती दूर करण्याविषयीं मी तत्पर असतें. त्यांच्या मर्जीबाहेर मी कधींही वागत नाहीं. फार काय सांगूं? त्यांची इच्छा, तीच माझी आवड; त्यांचा संतोष, तेंच माझें सुख; आणि त्यांचें प्रेम, तेंच माझें उत्तम बक्षीस. सत्यभामे, मजपाशीं मंत्रतंत्र काय तें एवढेंच आहे! ह्याशिवाय दुसरे अंगारेधुपारे मला माहीत नाहींत!

हें भाषण ऐकून सत्यभामा मनांत लाजली. पण इतक्यांत रथ तयार झाला, आणि ती द्रौपदीचे उपकार मानून व तिचा निरोप घेऊन चालती झाली.

---

## ३७. गमणें व वेळ मोडणें.

श्रीधरपंत साठे म्हणून एक मोठे व्यापारी होते. त्यांच्या दुकानावर धम्र्या आणि गंग्या असे दोन मुलगे चाकरीस ठेविले होते. धम्र्या दहा वर्षांचा होता, आणि गंग्या बारा वर्षांचा होता.

एके दिवशीं सकाळीं नऊ वाजतां श्रीधरपंतांनीं धम्र्यास सांगितलें कीं, "काल रामरावांनीं आपल्याकडचा माल नेऊन, त्याचे पैसे आतां साडेनऊ वाजतां देण्याचा वायदा केला आहे. त्यांच्याकडे जाऊन, त्यांजपासून तेवढी रक्कम मागून घेऊन ये." त्याच वेळीं त्यांनीं गंग्याजवळ एक पितांबराची घडी देऊन सांगितलें कीं, "तूं भिंवरावांकडे जाऊन हा पितांबर त्यांना दे. ते आतां दहा वाजतां कचेरींत जातील. लवकर जा हो!"

त्याप्रमाणें ते दोघे निघाले. त्यांची वाट एकच होती. कांहींसे

चालून गेले तों, त्यांना रस्त्यावर एक खेळणीं विकणारा आढळला. तीं खेळणीं फार सुंदर होतीं. त्यांच्याकडे गंग्याची दृष्टि गेली, आणि त्यांतलें एक हातांत घेऊन तो धर्म्यास म्हणाला, "धर्म्या, हा भोंवरा किती छान आहे! मजजवळ पैसेही आहेत; मी हा भोंवरा घेणार!"

त्याला धर्म्या म्हणाला, "अरे, तूं असा वेळ गमावूं नको. आधींच साडेनऊ वाजून गेले आहेत." पण तें न ऐकतां गंग्या भोंवरा घेण्यास थांबला. तें पाहून धर्म्या तेथून पुढें चालता झाला.

भोंवरा विकत घेतल्यावर त्याजकडे पाहात पाहात गंग्या पुढें चालला. इतक्यांत रस्त्याच्या बाजूस गारुड्याचा खेळ चालला होता, तो पाहण्यास तो पुन्हा उभा राहिला.

थोड्या वेळानें त्या गारुड्याच्या सभोंवतीं जी गर्दी जमली होती, तींत एकाएकीं एक पोळ शिरल्यामुळें, तेथें सगळी पळापळ झाली; आणि त्या धांदलींत गंग्याचा भोंवरा खालीं पडून, लोकांच्या पायांनीं उडून कोठें नाहींसा झाला. त्याचें त्याला वाईट वाटलें. इतक्यांत दहा वाजून गेले, आणि गंग्या श्रीधरावांच्या घरीं जाऊन पाहूं लागला, तों दाराला कुलूप दिसलें.

तिकडे धर्म्या रामरावांपासून रुपये घेऊन दुकानीं परत आला, आणि तितक्यांत हातीं पितांबर घेऊन गंग्याही तेथें येऊन पोहोंचला. श्रीधरपंतांनीं धर्म्याला वक्तशीर काम बजाविल्याबद्दल शाबासकी दिली, आणि, "पितांबर परत कां आणिलास?" म्हणून गंग्यास विचारिलें.

गंग्या म्हणाला, "भिंवराव घरीं भेटले नाहींत; त्यांच्या दारास कुलूप होतें." ह्या उत्तरानें श्रीधरपंतांचें समाधान झालें नाहीं. त्यांनीं चौकशी केली तींत असें स्पष्ट कळून आलें कीं, गंग्यानें वाटेंत गमून वेळमोड फार केली, आणि त्यामुळें तो भिंवरावांकडे वेळेवर पोहोंचला नाहीं. तेव्हां ते रागावून म्हणाले, "गंग्या, तूं घरीं चालता हो! असा गमणारा व वेळमोड करणारा मुलगा माझ्या उपयोगी नाहीं!"

## ३८. डोंबाऱ्यांचा खेळ.

एके रविवारीं दुपारीं गोविंदा व विनू ह्यांनीं एक ढोलकें वाजतांना ऐकिलें. तें कां वाजत आहे हें पाहण्याकरितां ते बाहेर आले, तों लोकांचा जमाव त्यांच्या दृष्टीस पडला. तेथें सुमारें चार पांच हात उंच अशा दोन काठ्या पुरल्या होत्या; व त्यांच्यामध्यें वरल्याभागीं एक दोर ताणिला होता. त्या दोरावर एक थाळी ठेवून, तींत उभी राहून, व दोन्ही हातांत एक काठी धरून, एक चौदा पंधरा वर्षांची मुलगी त्या दोरा-वरून सरकत जातांना त्यांनीं पाहिली. खालीं दोहीं बाजूंस दोन मनुष्य तिच्याकडे पाहात तिजबरोबर चालत होते. दुसरा एक म्हातारा मनुष्य ढोलकें वाजवीत, मोठमोठ्यानें, नानासाब, बाबासाब, दादासाब, अशा हाका मारून कांहींसें बोलत होता. तें पाहून विनू विचारितो, "भाऊ, हे लोक कोण? आणि ते काय करीत आहेत?"

गोविंदा—अरे, हे डोंबारी! ह्यांना कोणी नाडेभोरपीही ह्मणतात. ते आपला खेळ करीत आहेत. त्या पोरीकडे

पाहा ! थाळी सरकवीत सरकवीत, ती किती सफाईनें नाड्याच्या दुसऱ्या शेवटास गेली !



विनू—तो दुसरा डोंबारी काठ्या घेऊन काय करीत आहे ?

गोविंदा—तो पायांच्या बोटांत काठ्या धरून त्यांवर चढत आहे. बघ, तो काठ्यांवर पाय टेकून चालूं लागला. तो किती लांब लांब पावलें टाकीत आहे ! पाहा, पाहा ! आतां, तो उड्या मारूं लागला !

विनू—भाऊ, हे बघ इकडे तीन डोंबारी ! ह्यांनीं हातीं नागव्या तरवारी घेतल्या आहेत ! ते एकमेकांस मारणार कीं काय !

गोविंदा—छे! ते नागव्या तरवारींचा खेळ करणार आहेत. तो पाहा, तरवारीच्या तीक्ष्ण धारेवर एक चालूं लागला! तो दुसरा आपल्या तरवारीच्या धारेवर नाचत आहे! आतां तो तिसरा काय करणार बरें? लोक भराभर मागें कां बरें हटले? अरे! तो पट्ट्याचे हात करूं लागला! पाहा, तो आपल्या आंगाभोंवतीं पट्टा कसा गरगर फिरवीत आहे! कोण जाईल आतां त्याच्यापुढें?

विनू—शाबास ह्या लोकांची! ते आपल्या जिवाची सुद्धां परवा करीत नाहींत!

गोविंदा—इकडे बघ! हा लहान मुलगा, आपल्या बापाच्या डोक्यावर आपलें डोकें टेकून, उलटा उभा राहिला आहे. त्यानें पाय किती ताठ व सरळ केले आहेत! तिकडे पाहा, त्या डोंबाऱ्यानें केवढा मोठा ओंडा आपल्या दातांत धरिला आहे तो! वाहवा! किती सफाईनें त्यानें तो फिरवून फेकून दिला!

विनू—मला वाटतें, कांहीं तरी जादू असल्याशिवाय अशा प्रकारचे खेळ मनुष्यांस करतां येणार नाहींत!

गोविंदा—विनू, ह्यांत जादूबिदू कांहीं नाहीं. नेहमीं कसरतीचा अभ्यास करीत असल्यामुळें त्यांस असे खेळ करतां येतात. ते त्यांना लहानपणापासून शिकवितात. अशा प्रकारचे खेळ लोकांस करून दाखवून ते आपली उपजीविका करितात. ती पाहा मघांची दोरावर चालणारी पोरगी हातांत थाळी घेऊन, पैसे मागावयास येत आहे. आतां तिला कांहीं तरी दिलें पाहिजे.

विनू—होय. ह्यांनीं आज फार मौज केली!

## ३९. उपदेशपर फटका.

बिकट[1] वाट वहिवाट[2] नसावी, धोपट[3] मार्गा सोडुं नको ।
संसारामधिं ऐस आपला, उगाच भटकत फिरूं नको ।
चल सालसपण[4] धरूनि निर्वालस[5], खोट्या बोला बोलुं नको ।
अंगिं नम्रता सदा असावी, राग कुणावर धरूं नको ।
नास्तिकपणिं[6] तूं शिरूनि जनाचा बोल[7] आपणा घेउं नको ।
आल्या अतिथा मुठभर द्याया मागें पुढती पाहुं नको ।
(चाल बदलून) मायबापांवर रुसूं नको । दुर्मुखलेला[8] असूं नको ।
व्यवहारामधिं[9] फसूं नको । कधीं रिकामा बसूं नको ।
(चाल पहिली) परी उलोंढाली[10] भलभलत्या, पोटासाठीं करूं नको ॥ १॥
वेसं[11] काढुनी शेरमाथाला[12] उणें कुणाला बोलुं नको ।
बुडवाया दुसऱ्याचा ठेवा[13], करुनी हेवा[14], झटूं नको ।
मी मोठा शाहणा धनाढ्याहि[15], गर्वभार[16] हा वाहुं नको ।
एकाहुनि चढ एक जगामधिं, थोरपणाला मिरवुं[17] नको ।
हिमायतीच्या[18] बळें गरिब गुरिबांला तूं गुरकावुं नको ।
दो दिवसांची जाइल सत्ता, अपेशीं[19] माथां घेउं नको ।
(चाल बदलून) विडा पैजेचा उचलुं नको । वेणी[20] तराजू तोलुं नको ।
गहाण कुणाचें डुलेवुं[21] नको । उगिच भीक तूं मागुं नको ।
(चाल पहिली) स्नेह्यासाठीं पदरमोड[22] कर, परंतु जामिन राहुं नको ॥ २॥
उगीच निंदा स्तुती कुणाची स्वहितासाठीं करूं नको ।
बरी खुशामत[23] शाहण्याचि परि मूर्खाची[24] ती मैत्रि नको ।
कष्टाची बरि भाजिभाकरी, तूपसाखरे चोरूं नको ।
दिली स्थिती देवानें तींतच मानीं सुख, कधिं विटूं[25] नको ।

असल्या गांठीं[२५] धनसंचय[२६], कर सत्कार्यी[२७] व्यय[२८] हटूं नको ।
आतां तुज गुज[२९] गोष्ट सांगतों, सत्कर्मा तूं टाकुं नको ।
(चाल बदलून) सुविचारा[३०] कांतरूं[३१] नको । सत्संगत अंतरूं[३२] नको ।
द्वैताला[३३] अनुसरूं नको । हरिभजना[३४] विस्मरूं[३५] नको ।
(चाल पहिली) सत्कीर्ती-नौबादिचा[३६] डंका[३७] गाजे मग शंका[३९]च नको ॥ ३ ॥

अनंत फंदी.

---

## ४०. बोलका ढलपा.

नर्मदा नदीच्या कांठीं मोठमोठीं अरण्यें आहेत. त्या अरण्यांत पूर्वी भिल्ल लोकांशिवाय इतर लोकांची वसाति नव्हती. भिल्ल लोक तेव्हां अगदीं रानटी स्थितींत असून त्यांस आचारविचारांची मुळींच ओळख नव्हती. तो प्रदेश मराठे लोकांनीं काबीज केला, तेव्हां तेथील लोकांस आचारविचार शिकवून देवाधर्माची माहिती करून देण्यासाठीं कमाविसदाराबरोबर बाळशास्त्री पाराशरे ह्यांची नेमणूक झाली, असें म्हणतात. बाळशास्त्री ह्यांनीं नर्मदा कांठच्या एका खेड्याजवळ एक देवालय बांधण्याचें काम सुरू केलें. त्या वेळीं भिल्ल लोकांच्या अज्ञानाविषयीं एक चमत्कारिक गोष्ट घडली म्हणून सांगतात, ती अशी:—

एके दिवशीं बाळशास्त्री देवळाच्या कामावर गेले असतां, तेथें कमाविसदाराकडून त्यांस एक पत्र आलें. पण जवळ चष्मा नसल्यामुळें त्यांस तें वाचण्याची अडचण पडली. तो पाठवून देण्याविषयीं त्यांनीं जवळच पडलेल्या एका लाकडाच्या ढलप्यावर दोन शब्द लिहिले, आणि तेथें खपत असलेल्या एका भिल्लाजवळ तो ढलपा देऊन ते म्हणाले, “ अरे, एवढा हा

ढलपा माझ्या मुलाजवळ नेऊन दे, आणि तो जें देईल तें लौकर घेऊन ये."




तें ऐकून त्या भिल्लानें शास्त्रीबुवांस विचारिलें, "मी तुमच्या मुलास काय सांगूं?" ते म्हणाले, "तुला कांहीं एक सांगावें लागणार नाहीं. तूं कांहीं एक बोलूं नको. काय सांगावयाचें आहे, तें सगळें हा ढलपा सांगेल." तें कानीं पडतांच त्या भिल्लास पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें, आणि तो डोकें हालवून गंभीर मुद्रेनें म्हणाला, "बाबा, हा ढलपा कसा सांगेल? ह्याला का तोंड आहे, का ह्याला बोलतां येतें?" तेव्हां

शास्त्रीबुवा म्हणाले, " उगाच हुजत घालून वेळ गमावूं नको. ढलपा घेऊन पटकन जा कसा !"

मग तो भिल्ल गांवांत गेला; आणि ढलपा शास्त्रीबुवांच्या मुलाजवळ देऊन, ढलपा कसा बोलतो, तें पाहण्याकरितां तो त्याजकडे एकसारखी नजर लावून बसला. इतक्यांत मुलानें ढलप्यावरचे शब्द वाचून शास्त्रीबुवांची पोथी सोडिली, आणि आंतील चश्मा काढून त्यानें तो त्या भिल्लाजवळ दिला, आणि त्याला, " बाबांजवळ हा दे," म्हणून सांगितलें.

तेव्हां तो भिल्ल आपल्या ठिकाणीं पुन्हा चकित होऊन क्षणभर स्तब्ध उभा राहिला, आणि त्यानें मुलास विचारिलें, " बाबांस हेंच पाहिजे होतें, हें तुला कशावरून कळलें ?" मुलानें उत्तर दिलें कीं, " तूं आतांच मला ढलपा आणून दिलास ना ? त्यावरून कळलें." त्यावर भिल्ल म्हणाला, " ढलप्यावरून कसें कळलें ? तो बोलला काय ?" मुलगा म्हणाला, " होय, बोलला." त्यावर भिल्लानें पुन्हा विचारिलें, " तो बोलला तें मला नाहीं कोठें ऐकूं आलें तें ?" त्याला मुलगा म्हणाला, " तुला ऐकूं नाहीं आलें, पण मला आलें ! तूं आतां बोलून वेळ घालवूं नको. तो चश्मा लवकर नेऊन बाबांना दे. "

हें ऐकून त्या भिल्लास मोठा चमत्कार व हर्ष वाटून तो तेथून निघाला, आणि तो ढलपा हातानें वर धरून गांवच्या रस्त्यांतून उड्या मारीत चालला. चालतां चालतां तो ओरडून बोलला कीं, " पाहा पाहा, ह्या ब्राह्मण लोकांचें शाहाणपण ! ह्यांना ढलपे देखील बोलके करतां येतात ! "

---

# भाग दुसरा.

## भूगोलवर्णन.

### ३१. जेजुरीची सफर.

पुण्यापासून आठ नऊ कोसांवर सासवड म्हणून एक गांव आहे. त्या गांवीं गंगाजी नामें एक मनुष्य राहात असे. तो मातीचीं उत्तम चित्रें करून, तीं पुण्यास व इतर गांवीं विकण्यासाठीं घेऊन जात असे. एकदां गंगाजी कांहीं चित्रें घेऊन जेजुरी एथें चंपाषष्ठीस भरणाऱ्या यात्रेकरितां जावयास निघाला. तेव्हां आपला मुलगा किसन ह्यासही त्यानें आपणाबरोबर घेतलें.

वाटेनें जात असतां किसन विचारितो, "बाबा, आपल्या उजव्या हाताकडे तो किती उंच डोंगर आहे, पाहा! आपल्या-समोर तर डोंगरांची रांगच आहे! ह्या डोंगरांजवळ कांहीं गांवें आहेत काय?" गंगाजी म्हणाला, "आपल्या उजव्या हाताकडे जो उंच शिखराचा डोंगर आहे, त्याला पुरंदरचा डोंगर म्हणतात. त्यावर एक मोठा किल्ला आहे. आपल्या डाव्या हाताकडे जो डोंगर आहे, त्यावर भुलेश्वराचें जुनें देऊळ आहे. आपल्या समोरील टेकड्यांच्या रांगेंत तीं जीं दोन शिखरें दिसतात त्यांवर खंडोबाचीं दोन देवळें आहेत; व त्यांच्या पायथ्याशीं जेजुरी आहे. हे डोंगर सासवडाहून दिसतात, तें तुला ठाऊक आहे ना?"

किसन म्हणाला, "हो, बाबा. ही जी नदी दिसत आहे ती कऱ्हा असावी, नाहीं बरें?" गंगाजी म्हणाला, "ठीक बोललास. ही कऱ्हा नदी पश्चिमेकडून पूर्वेकडे वाहात गेली आहे."

किसन म्हणाला, " बाबा, आपल्या आसपास चोहींकडे किती लहान मोठे डोंगर व उंचवटे आहेत! हीं शेतें देखील कोठें खालीं, कोठें वर, अशीं दिसत आहेत. एकाद्या डोंगरावर चढून हा देखावा पाहण्यास मिळेल तर किती छान होईल!" गंगाजीनें म्हटलें, "आपण जेजुरीस गेलों, म्हणजे मी तुला एका डोंगरावर घेऊन जाईन; त्यावरून खुशाल हा देखावा पाहा."

जेजुरी हा गांव एका डोंगराच्या पायथ्याशीं वसला आहे. त्या डोंगरावर जें देऊळ आहे, त्या देवळाला जावयास सुमारें ३५० दगडी पायऱ्या आहेत. वरील देवळाच्या चोहींबाजूंस गच्ची आहे. गंगाजी व किसन पायऱ्या चढून वर गेले, व गच्चीवरून आसपासचा देखावा पाहूं लागले.

गंगाजी म्हणाला, " हा प्रदेश कसा वाटीसारखा आहे! वायव्येकडे तो दिव्याचा घाट पाहा. त्या घाटाच्या अलीकडे जी झाडी दिसत आहे तींत सासवड आहे. नैर्ऋत्येस एथून एका कोसावर जो डोंगर दिसत आहे, त्यास कडेपठार म्हणतात. त्यावरही एक देऊळ आहे." किसन म्हणाला, "बाबा, पूर्वेकडे हें केवढें मोठें तळें आहे! ह्या तळ्याजवळील तीं पडकीं घरें कोणाचीं असतील बरें?" गंगाजीनें उत्तर केलें, " त्या ठिकाणीं जुनी जेजुरी होती. ती आतां बहुतेक ओसाड झाली आहे. तें आगगाडीचें स्टेशन किती खोलगट जागेंत आहे, पाहा! तें ह्या मोठ्या खोऱ्यांत आहे."

जेजुरीहून परत घरीं आल्यावर गंगाजीनें चित्रें करण्याची माती तयार केली; व मुलास बोलावून म्हटलें, " हें पाहा,

किसन, आपण जेजुरीस डोंगरावर उभे राहून, डोंगर, टेकड्या, नदी, दरेखोरे, पाहिले; त्यांचा आतां एक लहानसा उठावाचा नकाशा फळीवर तयार करूं. ही फळी तूं घे, व ही मी घेतों. आतां मी करतों तसें तूंही कर. पहिल्यानें ही माती आपण फळीवर थापूं. जेथें डोंगर आहेत तेथें आणखी माती रचून मोठे उंचवटे दाखवूं. डोंगरांची रांग आहे तेथें माती घालून ते एकमेकांस जोडूं. एथें जेजुरीची टेकडी आहे, ती लहानसा उंचवटा करून दाखव. ही सपाटी पूर्वेकडे उतरती आहे, तसी ती दाबून उतरती कर. आतां कऱ्हानदी व तिला मिळणारे ओढे आहेत, ते कोरणीनें वळणा वळणाच्या रेघा काढून दाखवूं. नदी मोठी होत गेली आहे ह्याकरितां हा तिचा पुढला भाग रुंद खोदून दाखविला पाहिजे. ही तळ्याची जागा; एथें आंगठ्यानें माती जरा चेप, म्हणजे खोलगट जागा होईल; तेंच तळें."

अशा प्रकारें तो उठावाचा नकाशा तयार झाल्यावर, त्याला गंगाजीनें रंग देऊन, तो किसनच्या शाळेस नजर केला.

---

## ४२. डोंगर व मैदानें.

एकाद्या डोंगराच्या शिखरावर बसून तुम्ही आसपासचा देखावा कधीं पाहिला आहे काय ? टेकड्या, पर्वत, मैदानें, दरे, ओढे, नद्या ह्यांची शोभा शिखरावरून जशी दिसते, तशी सपाटीवरून दिसत नाहीं. आपल्या महाराष्ट्रांत टेकड्या व डोंगर आणि दरे व मैदानें चहूंकडे आहेत. आपण आग-गाडींत बसून मुंबईहून भुसावळेस किंवा सोलापुरास गेलों

आणि पुण्याहून धारवाडास गेलों, तर महाराष्ट्र देशाची रचना कशी आहे तें कांहींसें लक्षांत येईल.




जमिनीच्या उंचवट्यास टेकडी म्हणतात. मोठ्या टेकडीस डोंगर म्हणतात. डोंगर फार मोठा व उंच असल्यास त्यास पर्वत म्हणतात. टेकड्या व डोंगर किंवा पर्वत तळाशीं लागलेले असल्यास, त्यांस डोंगरांच्या अथवा पर्वतांच्या रांगा म्हणतात. दोन रांगांच्यामध्यें जो खोल प्रदेश असतो त्यास दरा किंवा खोरें म्हणतात.

चला, आपण सह्याद्रीच्या रांगेंत खंडाळ्याजवळच्या बोर-घाटांत जाऊं, आणि ज्या शिखरावर मुंबईहून पुण्यास जाणारी गाडी उभी राहते, आणि जेथून मग रोख बदलून उलट चालूं लागते, त्या शिखरावर बसूं. आतां पश्चिमेकडे तोंड करून दूरवर नजर फेका. तो सखल प्रदेश पाहा. त्याच्या आसपास किती उंच डोंगर आहेत! त्या प्रदेशांत उत्तम भात पिकतें.

कांहीं डोंगरांस कसे सुळके आहेत, बघा! वारा, पाऊस

तुफानें व ऊन ह्यांच्या तडाक्यानें डोंगरांचीं शिखरें फुटतात व झिजतात, आणि अशीं टोकें व सुळके बनतात. अशी झीज होऊन होऊन, हे सुळकेही कांहीं वर्षांनीं नाहींतसे होतील. डोंगर झिजून त्यांची माती होते. ती पावसाच्या पाण्यानें खालीं येऊन शेतकीच्या जमिनीवर बसते. अशानें लागवडीची जमीन वरचेवर नवी होते.

पूर्वेकडे हा किती खोल दरा आहे, पाहा ! त्याच्या तळाशीं कशी किर्र झाडी आहे ! ह्या दऱ्याच्या बाजू कशा भिंतींसारख्या उभ्या आहेत ! अशा डोंगरांस कडे तुटलेले डोंगर म्हणतात. कांहीं डोंगरांचीं शिखरें कशीं सपाट व लांबरुंद दिसत आहेत, पाहा ! अशाच एका डोंगरावर आपण आतां बसलों आहों. कित्येक डोंगरांच्या सपाट माथ्यांवर श्रीमंत लोक राहण्यासाठीं बंगले बांधितात. महाबळेश्वर, माथेरान, खंडाळें, इगतपुरी, ह्या ठिकाणीं असे बंगले दृष्टीस पडतात.

डोंगर व मैदानें हीं कशीं होतात तें थोडक्यांत सांगतों. उंच जमिनी पाण्यानें झिजून झिजून त्यांमध्यें मोठमोठ्या व खोल अशा घळी पडतात. त्या घळी पुढें पसरट होऊन त्यांचे दरे होतात. दरा मोठा व बराच सपाट असला म्हणजे त्यास मैदान म्हणतात. दोन घळींच्या दरम्यान जो खडकाळ भाग उरतो, तो वर आल्यासारखा दिसतो; तेच टेकड्या व डोंगर. पृथ्वीच्या पोटांत फार उष्णता आहे; त्या उष्णतेच्या जोरानें जमिनीचे मोठमोठे भाग कधीं कधीं वर येतात. अशा रितीनेंही टेकड्या व डोंगर होतात.

पर्वत व मैदानें ह्यांचे अनेक उपयोग आहेत. पर्वतावरील हवा स्वच्छ व थंड असते. डोंगराळ प्रदेशांत पाऊस जास्त पडतो; कारण उंच शिखरें मेघांस आपणांकडे ओढून घेतात. पर्वतांपासून लहान मोठ्या नद्या उत्पन्न होतात. घरें, पूल, वगैरे बांधण्याकरितां डोंगरांतून चांगले दगड निघतात. मैदानांवर लोक गांव व शहरें वसवितात, आणि शेतकी करून धान्य पिकवितात.

---

## ४२. नद्या व सरोवरें.



आम्ही पाण्याचे अगदीं लहान थेंब आहों, तरी आम्ही ह्या पृथ्वीवर मोठमोठीं कामें करितों. आम्ही कोणकोणतीं कामें करितों हें तुम्हांस सांगितलें, तर तुम्हांस फार नवल वाटेल.

आकाशांत जे ढग असतात त्यांमध्यें आमचा जन्म होतो. तेथून आम्ही डोंगरांवर, टेकड्यांवर, व मैदानांवर उतरतों. अशा रितीनें आम्ही खालीं आलों, म्हणजे आम्हांस पाऊस म्हणतात.

पाऊस पडूं लागला म्हणजे कांहीं पाणी कोरड्या जमिनींत मुरतें. तुम्ही खेळतांना धुरळ्याच्या ढिगांवर जें पाणी ओतितां तें त्यांत कसें मुरतें, तें तुम्हीं पाहिलें आहे. जें पाणी मुरत नाहीं, तें वाहून जातें; म्हणजे त्याचे बारीक बारीक ओहोळ बनतात, व ते जमिनीच्या खोलग्यांतून वाहूं लागतात.

पाऊस जास्त पडूं लागला म्हणजे असे हजारों ओहोळ वाहूं लागतात. पुढें ते एकत्र होऊन वाढत जातात, व त्यांचे ओढे बनतात. ओढेही वाहात जातां जातां एकत्र होतात, व त्यांच्या नद्या बनतात. नद्या सखल जमिनींतून व दऱ्याखोऱ्यांतून वळणें घेत घेत शेवटीं समुद्रास जाऊन मिळतात.

आम्ही पाण्याचे अगदीं लहान थेंब आहों खरे; तरी आमच्या आंगीं केवढी शक्ति असते हें तुम्हांस पाहावयाचें असल्यास एखाद्या धबधब्याजवळ जा; म्हणजे त्याचा भयंकर आवाज कसा होत असतो, आणि त्यांतील पाण्याच्या जोरानें मोठमोठे खडक कसे फुटून जातात, हें तुम्हांस कळेल. महाराष्ट्रांत महाबळेश्वराचे डोंगरांत वेण्या नदीचा धबधबा आहे. ह्या धबधब्याचें पाणी सहाशें फूट उंचीवरून खालीं पडतें.

जमिनीवर तांब्याभर पाणी ओतिलें म्हणजे त्यापैकीं कांहीं पाणी वाहून जातें, आणि कांहीं जमिनीवर जे लहान लहान खळगे असतात त्यांत जमतें. पावसाचें पाणीही सर्वच समुद्रांत वाहून जात नाहीं; तर जमिनीवर जागोजागीं जे लहान मोठे खळगे असतात त्यांतही तें वाहून जातें व सांचतें. अशा सांचलेल्या पाण्यास तळें किंवा सरोवर म्हणतात. सरोवर

हें तळ्यापेक्षां फार मोठें व खोल असतें. तळ्यांतील पाणी गोडें असतें, पण कांहीं सरोवरांतील पाणी कमजास्त मानानें खारट असतें.

ज्या सरोवरांचें पाणी नद्यांनीं बाहेर जातें, तीं गोडीं असतात. ज्या सरोवरांत बाहेरून पाणी येतें, पण त्यांतून तें बाहेर वाहून जात नाहीं, त्यांचें पाणी खारट असतें. तळ्यांतील पाण्याचा पिण्यासाठीं व शेतासाठीं लोक नेहमीं उपसा करितात, ह्यामुळें त्यांचें पाणी गोडें असतें. तसा उपसा न होईल तर कालांतरानें त्यांचेंही पाणी खारट होईल.

डोंगराळ प्रदेशांतून वाहणाऱ्या नद्यांस, एकादे वेळीं, डोंगरावरील धोंडे व माती पडून बांध पडतो. असें झालें म्हणजे त्यांचें पाणी तुंबून तळीं अथवा सरोवरें बनतात.

मुलांनो, आम्ही ज्या नद्या व तळीं करितों, त्यांचा मनुष्यास फारच उपयोग होतो. त्यांतील पाणी पिण्याच्या व शेतांच्या उपयोगीं पडतें. एवढेंच नाहीं, तर त्यांत जे मासे राहतात, त्यांवर कित्येक लोक आपला निर्वाह करितात. आम्हीं जर नद्या व तळीं केलीं नाहींत, तर तुम्हां मनुष्यांची किती दुर्दशा होईल, ह्याचा विचार तुम्ही कधीं करतां काय?

---

## ४८. समुद्र व महासागर.



नूरमहंमदास समुद्राच्या किनाऱ्यास जाऊन बसण्याची फार हौस असे. समुद्राच्या पाण्याचा जो एकसारखा खळखळ आवाज होत असतो, तो ऐकून नूरमहंमद अगदीं गुंग होऊन जाई. त्याचा बाप खलाशी होता. दूर देशाहून सफर करून येतांना त्यानें आपल्या मुलाकरितां मोठमोठ्या शिंपा, चमत्कारिक शंख व इतर वस्तु आणाव्या. मी मोठा झाल्यावर बापासारखा खलाशी होईन, असें नूरमहंमद सर्वांस सांगत असे.

एके दिवशीं नूरमहंमद आपल्या बापाच्या गलबताची वाट पाहात समुद्राच्या किनाऱ्यावर बसला होता; तेव्हां एकाएकीं पाण्यांत फार खळबळ झालेली त्यानें पाहिली. थोड्या वेळानें त्या खळबळींतून एक मोठा मासा त्याजवळ आला, व पाण्यावर डोकें काढून म्हणाला, "काय रे मुला, तूं एथें बसून काय करितोस?"

नूरमहंमद म्हणाला, "मी समुद्राच्या लाटांची मौज पाहात

आहे. मला जर तुजसारखें पाण्यांत राहून दूर जातां येतें, तर मौज झाली असती. मग समुद्राच्या तळाशीं काय आहे, समुद्र किती मोठा व खोल आहे, हें सर्व मला कळलें असतें."

मासा म्हणाला, "अंः! मी तुला पाहिजे तें सांगतों; लक्ष देऊन ऐक. खाऱ्या पाण्यानें भरलेल्या अशा फार मोठ्या खळग्यास समुद्र म्हणतात. समुद्र फार खोल असतो. जमिनीवरील मोठमोठे पर्वत समुद्रांत टाकिले, तर ते सहज बुडून जातील असें मला वाटतें. मी नेहमीं समुद्राच्या तळाशीं जातों. तेथें पुष्कळ गाळ व बारीक रेती असते. तसेच मासे, कासवें व समुद्रांत राहणारे इतर प्राणी ह्यांचीं हाडें व सांगाडे, आणि लहान मोठ्या शिंपा व शंख, ह्यांचे थर तळाशीं दिसून येतात."

नूरमहंमदानें विचारिलें, "काय रे माशा, महासागर कसा असतो?" मासा म्हणाला, "महासागर समुद्रासारखाच असतो; पण समुद्रापेक्षां तो फारच मोठा असतो. तो हजारों कोस लांब रुंद असतो. महासागर कित्येक ठिकाणीं इतके खोल असतात कीं, मजसारख्या मोठ्या माशास देखील तशा ठिकाणीं जाण्याची भीति वाटते."

नूरमहंमद म्हणाला, "समुद्राच्या पाण्यावर लाटा कां बरें येतात?" मासा म्हणाला, "समुद्राच्या पाण्यास नेहमीं खळबळ असते, ह्याचें एक कारण असें कीं, समुद्रावर नेहमीं वारा वाहात असतो. वारा जोराचा होऊन तुफान झालें, म्हणजे तर फारच मोठ्या लाटा उसळूं लागतात. दुसरें, समुद्राचें पाणी रोज कमीजास्त होतें हें तूं पाहिलें असशील; त्याही कारणानें

त्यास लाटा येतात. कधीं फारच मोठ्या लाटा उसळूं लागल्या म्हणजे आम्हां माशांस देखील त्यांचें फार भय वाटतें."

नूरमहंमदानें विचारिलें, "समुद्राचें पाणी कधीं हिरवें, कधीं पिवळें, असें कां बरें दिसतें?" मासा म्हणाला, "समुद्राच्या पाण्यास रंग नसतो; पण त्यांत किनाऱ्यावरली माती जाते, आणि अगदीं बारीक वनस्पतींचे तुकडे तरंगत असतात, ह्यामुळें त्याच्या पाण्यास कधीं हिरवट, कधीं पिवळट, असा रंग येतो."

नूरमहंमद म्हणाला, "समुद्राचें पाणी खारें कां बरें असतें?" मासा म्हणाला, "जमिनीवरील नद्यांचें पाणी समुद्रांत वाहून येतें; त्यांत रोज थोडे थोडे खारट पदार्थ येतात. हे पदार्थ समुद्रांत सांचल्यानें त्यांतील पाणी खारें झालें आहे, असें मी ऐकतों. पण, मुला, आतां मला जाऊं दे. मला भूक लागली आहे. इथें बरेच लहान मासे दिसत आहेत, ते धरून, खावेसें मला वाटतें."

---

## ४९. समुद्र-किनारा.

नूरमहंमद थोडा मोठा झाल्यावर आपल्या बापाच्या गलबतावर खलाशाचें काम शिकण्यास गेला; व कांहीं वर्षांनीं तो त्या कामांत फार हुशार झाला. अनेक देश, समुद्र व महासागर त्याच्या पाहण्यांत आल्यामुळें, त्यास भूगोलाचें चांगलें ज्ञान झालें. लोक त्याला आतां नूरसाहेब म्हणूं लागले.

एके दिवशीं त्याच्या गांवच्या शाळेंतील मुलांनीं त्यास विचारिलें, "नूरसाहेब, आपण अनेक देशांचा किनारा पाहिला आहे, तर त्या संबंधानें आम्हांस कांहीं माहिती सांगतां काय?"

नूरसाहेब म्हणाले, “ ठीक आहे; सांगतों ऐका:—

“समुद्राच्या लहान मोठ्या लाटा रात्रंदिवस कमजास्त जोरानें जमिनीवर आदळत असतात. मऊ जमीन लाटांच्या जोरानें लवकरच झिजून जाते, व तिजवर हळू हळू पाणी चढतें. अशानें गांवें, शेतें व मोठमोठे प्रदेश पाण्याखालीं बुडून जातात. कित्येक देशांच्या किनाऱ्यांवर ह्या कारणामुळें दरवर्षीं जास्त जास्त पाणी चढत चाललें आहे. ज्या ठिकाणीं किनारे खडकाळ व कठीण असतात, त्या ठिकाणीं लाटांनीं फारसा नाश होत नाहीं; तरी त्यांची झीज हळू हळू चाललीच असते.

“ लाटांनीं जमिनीची अशी झीज झाल्यामुळें किनाऱ्याची




फार दुर्दशा होते. कित्येक ठिकाणीं एकाद्या खडकाळ दरडीच्या दोहोंकडील मऊ भाग झिजून जाऊन समुद्राचे फांटे जमिनींत शिरतात, किंवा ती दरड सोंडेसारखी समुद्रांत गेलेली दिसते. अशा सोंडेस ‘भूशिर’ म्हणतात. समुद्राचे फाटे अरुंद असून जमिनींत दूरवर गेले असल्यास, त्यांस ‘आखात’ म्हणतात; पण ते रुंद व पसरट असून जमिनींत फार दूरवर गेले नसल्यास, त्यांस ‘उपसागर’ म्हणतात.

" किनाऱ्यांवर कधीं कधीं तुटलेले कडे असतात. अशा कड्यांच्या तळांशीं समुद्राच्या लाटा आदळतात. लाटांबरोबर मोठमोठे दगड व गोटे जोरानें येऊन खडकावर आपटतात. असें शेंकडों वर्षें चालू राहिलें म्हणजे त्या कड्यांत भोकें पडून लहान मोठ्या गुहा होतात. अशा एकाद्या गुहेंत तुम्ही जाल, तर गुहेच्या बाजू, दगड घासल्यानें, गुळगुळीत झाल्या आहेत, असें तुम्हांस दिसेल.

"कधीं कधीं एकाद्या डोंगराच्या अथवा खडकाळ प्रदेशाच्या आजूबाजूस मऊ जमीन असते. ही मऊ जमीन लाटांच्या धडाक्यानें हळू हळू झिजून, त्या खडकाळ जागेच्या चारी बाजूंस समुद्र होतो. अशा खडकाळ जागेस 'द्वीप' किंवा 'बेट' म्हणतात. ज्या प्रदेशाच्या तिहींकडून पाणी असून त्याची चौथी बाजू जमिनीशीं जोडलेली असते, त्यास 'द्वीप-कल्प' म्हणजे ' बहुतेक बेट ' म्हणतात.

"आतां खाडी म्हणजे काय तें सांगतों. तुम्ही कधीं आगगाडींत बसून मुंबईस जाल, तर कल्याण व मुंबई ह्यांच्यामध्यें दोन ठिकाणीं पूल बांधून समुद्राच्या फाट्यांवरून आगगाडीची सडक नेली आहे, असें तुम्हांस दिसेल. कल्याण सोडून पुढें गेल्यावर पहिला फाटा लागतो. हा फाटा समुद्राच्या भरतीचें पाणी एका नदीच्या मुखांत शिरल्यानें झाला आहे. ठाण्याजवळ आल्यावर, जो दुसरा फाटा लागतो तो समुद्राच्या एका

बाजूनें निघून त्याच्या दुसऱ्या बाजूस त्यास पुन्हा मिळाला आहे. ह्या दोन्हीं फाट्यांस ‘ खाड्या ’ म्हणतात. कोठें दोन समुद्र खोल व रुंद खाडीनें जोडले जातात. अशा खाडीस ‘ सामुद्रधुनी ’ म्हणतात.

“ समुद्राच्या लाटांनीं जमिनीचा नाश होतो खरा; तरी कित्येक ठिकाणीं त्यांनीं जमीन वाढते. एका ठिकाणची वाळू, रेती व माती निघून दुसऱ्या ठिकाणीं कोठें तरी सांचते. अशा जागीं लाटांचा जोर कमी असला, म्हणजे हळू हळू नवीन जमीन तयार होऊं लागते. अशी घडामोड समुद्रकिनाऱ्यावर दरदिवशीं चालली असते. ”

## ४६. खेडेगांवांतील [illegible]

रघूजी पाटील माने हा अहमदनगर जिल्ह्यांतील पिंपळगांवीं राहात असे. त्याची शेतवाडी बरीच होती; पण शेतीची सर्व जमीन कोरडवाहू होती. तीस पाटाचें पाणी मिळण्यासारखें नव्हतें. तेव्हां आपल्या शेतांत एक मोठी विहीर खणण्याचा पाटलानें बेत केला. पिंपळगांव अहमदनगराहून ४०।५० कोस लांब होतें, म्हणून पिकावें, खोरीं, पहारयी, हीं विहीर खणण्यास लागणारीं हत्यारें पिंपळगांवच्या सिद्राम घिसाड्याकडूनच करवून घ्यावीं, असें त्यानें ठरविलें. सिद्राम घिसाडी हा लोहारकामांत फार हुशार होता. पिंपळगांवच्या

शेतकरी लोकांच्या नांगरांचे फाळ व शेंब्या, कोळप्यांचीं पातीं, लोखंडी शिवळा तो करीत असे, व गाड्यांच्या



धावा बसवीत असे. ह्या कामांपासून त्यास चांगलें उत्पन्न होई.

विहीर बरीच खोल खणल्यावर तीस चांगलें पाणी लागलें; तेव्हां ती चुन्यानें व दगडानें बांधून काढावी असें पाटीलबुवांनीं ठरविलें. बांधकाम रचण्यापूर्वीं विहिरींत लाकडाची चौकट बसवावी लागते. तशी चौकट तयार करण्यास त्यानें हरिबा सुतारास सांगितलें. हरिबाजवळ जुनाट जांभळीचें एक खोड होतें. तें खोड कापून त्याच्या तुकड्यांची त्यानें एक भक्कम चौकट तयार केली. हरिबा सुतारास फार कामें असत. शेतकऱ्यांचीं आउतें करणें, नवीन घरांचे खांब, तुळ्या, वांसे व

आढीं बसविणें, आणि गाड्या, खिडक्या व दारें तयार करणें, हीं कामें त्यास नेहमीं करावीं लागत.



विहीर व थारोळें बांधून तयार झाल्यावर तीस दोन मोटा लावण्याचा रघूजी पाटलानें बेत केला. त्यासाठीं त्यानें कुशा ढोरास बोलावून आणिलें, व त्याकडून दोन तीन चांगलीं जाड कातडीं रापवून घेतलीं; आणि तीं परशा चांभारास देऊन, त्याकडून दोन मोटा तयार करवून घेतल्या. मोटेस लागणारे दोर नरसू मांगानें वळून दिले.

पिंपळगांवीं जीं गुरें मरत त्यांचीं कातडीं कुशा घेई, व तीं कमावून मोटा व जोडे करण्यासाठीं तीं चांभारास विकी. परशा चांभार केवळ धोबड काम करीत असे; सफाईचें काम त्याच्या हातून होत नसे. नरसू मांग अंबाडीचे, तागाचे व सालींच्या वाकाचे दोर करून आपलें पोट भरी.

विहिरीस दोन मोटा चालू झाल्यावर माने पाटलास वर्षा दोन वर्षांत शेताचें चांगलें उत्पन्न होऊं लागलें, व दोन पैसे शिल्लक राहूं लागले. तेव्हां बायकांमुलांस कांहीं डागदागीने करावे असें त्याच्या मनांत आलें. मग एके दिवशीं नगरास जाऊन त्यानें दहा तोळे सोनें विकत आणिलें, व आपल्या गांवांतील नारायणशेट सोनाराच्या दुकानांत बसून, त्यानें जे पाहिजे होते ते दागिने करवून घेतले.

आणखी दोन वर्षें लोटल्यावर रघुजी पाटलानें आपल्या एकुलत्या मुलाचें लग्न करण्याचें ठरविलें. पाटलाची स्थिति चांगली झाली होती, म्हणून ह्या वेळीं त्यानें पुष्कळ खर्च केला. गांवच्या गोरगरीब लोकांस त्यानें एकदां पोटभर जेऊं घातलें, व आपल्या गांवीं तयार झालेल्या घोंगड्या, खाद्या व धोतरें त्यांस वाटिलीं.

पिंपळगांवीं रामप्पा ह्या नांवाच्या एका लिंगाईत सणगराचें घर होतें. त्याचे दोघे मुलगे व घरांतील बायका लोंकर पिंजून व कातून तयार करीत, व रामप्पा घोंगड्या विणी. पिंपळगांवच्या कांहीं महारांचे घरीं माग होते. त्या मागांवर ते सुताच्या जाड खाद्या व जाडीभरडीं धोतरें विणीत. तीं फार टिकाऊ असल्यामुळें त्यांचा त्या गांवीं फार खप होत असे.

अशा रितीनें रघूजी पाटील माने बहूत वर्षें पिंपळगांवीं सुखानें राहिला.

---

## ४७. शहर व गांव.

मकरसंक्रांतीस सोलापूर शहरीं मोठी जत्रा भरते. हीं जत्रा सुमारें महिनाभर चालते. शहराच्या पश्चिमेस एक मोठें तळें आहे, त्यास सिद्धेश्वराचें तळें म्हणतात. त्या तळ्याच्या पूर्व-कडील बाजूस दुकानदार लहान मोठे तंबू, राहुट्या व पालें उभीं करून, त्यांत नानातऱ्हेचा माल विकण्यासाठीं आपलीं दुकानें मांडून ठेवितात.

सोलापुरापासून सुमारें आठ कोसांवर वळसंग ह्या नांवाचें एक लहानसें गांव आहे. त्या गांवीं होनाजी व सिदप्पा ह्या नांवाचे दोघे कोष्टी राहात असत. ते स्वतां सूत रंगवून हलकीं रेशीमकांठीं लुगडीं व बांड विणीत. त्या दोघांनीं सोलापूर शहर कधीं पाहिलें नव्हतें. एके वर्षीं ते दोघे शेंदीडशें रुपयांचा माल घेऊन संक्रांतीच्या जत्रेस जावयास निघाले.

सोलापुरास आल्यावर त्यांनीं बरोबर आणिलेला माल विकून टाकिला, व परत जाण्यापूर्वीं शहरांतील मुख्य मुख्य ठिकाणें वगैरे पाहण्यास ते निघाले. शहरांत हिंडत असतां सिदप्पा म्हणाला, "काय हो होनाजी, ह्या शहरांतील रस्ते किती रुंद व सरळ आहेत! त्यांवर खडी घालून ते अगदीं कठीण केले आहेत. आपल्या गांवचे रस्ते ह्यांपुढें किती भिकार वाटतात! त्यांवर किती तरी धूळ असते!" होनाजी म्हणाला, "हे रस्ते स्वच्छही आहेत. सकाळ झाली कीं रस्ते झाडणारीं माणसें नेमिलेले रस्ते झाडून साफ करितात, आणि जो केरकचरा निघेल तो गाडींत घालून गांवाबाहेर घेऊन जातात.

आपल्या गांवांत किती तरी घाण व उकिरडे आहेत ! वारा सुटला म्हणजे रस्त्यांवरील कचरा चहूंकडे उडूं लागतो."

सिद्‌प्पा म्हणाला, "अप्पा, एथें पाण्याची किती बरें उत्तम सोय आहे! जागोजागीं हे लोखंडी खांब आहेत व ह्यांस पाण्याच्या नळ्या लाविल्या आहेत. भर उन्हाळ्यांत देखील त्यांमध्यें पाणी असतें असें लोक सांगतात. बळसंगास पाण्याची किती तरी अडचण! उन्हाळा लागला कीं विहिरी सुकून जातात, व ओढ्यांत केवळ कोरडी वाळू नजरेस पडते!"

होनाजी म्हणाला, "ह्या इमारतीस इस्पितळ म्हणतात. आपले सदोबा पाटील ह्याच इस्पितळांत गेल्या महिन्यांत असावे. चला आपण परवानगी घेऊन आंत जाऊं, व आंत कशी काय व्यवस्था आहे ती पाहूं."

आंत गेल्यावर इस्पितळांतील सर्व टापटीप, आजारी मनुष्यांची सोय व एकंदर स्वच्छता पाहून त्यांस फार नवल वाटलें; व आपल्या गांवीं सरकार एक लहानसें इस्पितळ घालील तर फार बरें होईल, असें बोलत ते बाहेर पडले.

सिद्‌प्पा म्हणाला, "काय हो अप्पा, मोठ्या शहरांत सर्वच गोष्टी मोठ्या असतात. ह्या उंच उंच हवेल्या पाहा! किती ह्या मजबूत बांधिल्या आहेत! ह्या दुकानांत किती तरी हा माल ठेविला आहे! हीं हलवायांचीं दुकानें पाहा; ह्यांत किती तऱ्हेतऱ्हेची मिठाई मांडून ठेविली आहे!"

होनाजी बोलतो, "हीं लुगड्यांचीं दुकानें बघा! ह्यांत हजारों रुपयांचा माल भरून ठेविला असेल. आपण जो

शेंदीडशें रुपयांचा माल आणिला होता, तो ह्या दुकानांतील मालाच्या पासंगास तरी लागेल काय ? ”

सिदप्पा म्हणाला, “ धोनाजी अप्पा शहरांत राहणें सुखाचें आहे खरें; तरी एथें राहण्यास खर्चही फार लागत असेल. पैसा टाकिल्याशिवाय ह्या शहरांत कांहींच मिळत नाहीं, हें आपण पाहून चुकलों आहों. चला, आपण बरेंच हिंडलों. आतां आपल्या गांवीं परत जाण्याची व्यवस्था करूं. ”

---

## ४८. तालुक्यांतील कामगार व नौकर.

देशाचा कारभार नीट चालावा म्हणून सरकारानें ह्या देशाचे विभाग, व पोटविभाग केले आहेत. त्यांपैकीं सर्वांत लहान अशा पोटविभागास तालुका म्हणतात. तालुक्यांत सरकारी कामें कोणतीं असतात व तीं कशीं चालतात ह्याविषयीं आज तुम्हांस थोडी माहिती सांगावयाची आहे.

तालुक्याची एकंदर व्यवस्था एका लहानशा राज्याच्या व्यवस्थेसारखी असते. तालुक्याच्या गांवीं जमिनीचा वसूल जमा होतो, लहान लहान गुन्ह्यांची चौकशी होते, दस्तऐवज कायद्याप्रमाणें नोंदले जातात, टपालांतून पत्रें वगैरे पाठविण्याची चांगली सोय असते, गोरगरीब आजारी लोकांस फुकट औषध मिळतें, मुलांच्या अभ्यासाकरितां शाळा घातलेल्या असतात, व सरकारी जंगलें व कुरणें राखलीं जातात. हीं सर्व कामें कोण करितात तें आतां सांगतों.

प्रत्येक तालुक्यांत **मामलेदार** ह्या हुद्याचा एक मुख्य कामगार असतो. तालुक्यांत जें ठाण्याचें गांव असतें, त्यांत

त्याची कचेरी असते. तालुका मोठा असला तर त्याचे एक किंवा दोन पोटभाग केलेले असतात; त्यांस पेटे म्हणतात. पेट्यांतील मुख्य कामगारास महालकरी म्हणतात. महालकरी व मामलेदार हे जमिनीचा वसूल जमा करितात व त्याचा हिशेब ठेवितात. तालुक्यांत सरकारी खजीना असतो, तो मामलेदाराच्या ताब्यांत असतो. महालकरी व मामलेदार ह्यांस लहान गुन्ह्यांची चौकशी करण्याचा अधिकार असतो, त्यावरून त्यांस माजिस्ट्रेट असेंही म्हणतात. मामलेदाराच्या हाताखालीं हेड-कारकून असतो, त्याजकडे विशेषेंकरून हिशेबाचें काम असतें. त्यासच कोणी फडणीस असेंही म्हणतात. ह्याशिवाय मामलेदाराच्या कचेरींत इंग्रजी व मराठी काम करणारे कित्येक कारकून असतात.

तालुक्यांत दंगेधोपे व गुन्हे होऊं नयेत म्हणून सरकार खबरदारी घेतें. गुन्हे झाल्यास, गुन्हेगारांस पकडून माजिस्ट्रेटाकडे नेण्याकरितां फौजदार म्हणून एक अधिकारी असतो. त्याच्या हाताखालीं, जमादार, हवालदार व नाईक असे अमलदार व कित्येक पोलीस शिपाई असतात.

तालुक्यांतील दस्तऐवज नोंदण्याकरितां एक कामगार नेमिलेला असतो, त्यास सब-रजिस्ट्रार म्हणतात. देण्याघेण्यासंबंधानें लोक जे लेखी करार करितात, त्यांस दस्तऐवज म्हणतात. ते सरकारी कायद्याप्रमाणें छापील कागदावर लिहून रजिस्टर कचेरींत नोंदून घेतले, म्हणजे पैसे बुडण्याचें फारसें भय नसतें.

टपालखात्याचें काम चालविण्यासाठीं प्रत्येक तालुक्याच्या गांवीं एक कामगार असतो, त्यास पोस्ट-मास्तर म्हणतात. परगांवांहून आलेलीं पत्रें, लखोटे, व मनी आर्डरी म्हणजे पैशांच्या हुंड्या शिपायांकडून लोकांस पोहोंचत्या करणें, व परगांवीं पाठविण्याचीं पत्रें वगैरे पिशव्यांत बंद करून त्यांची रवानगी करणें, हीं कामें पोस्टमास्तर करितो. त्याच्या हाताखालीं कारकून, शिपाई, व डाक नेणारे आणणारे गडी असतात.

तालुक्यांत अनेक शाळा असतात. त्यांपैकीं ठाण्यांतली शाळा इतर बहुतेक शाळांपेक्षां मोठी असते. त्या शाळेचा हेड-मास्तर तालुक्यांतील इतर शाळामास्तरांचे पगार वांटितो व त्यांकडून येणारे फीचे पैसे ताब्यांत घेऊन खजिन्यांत पाठवितो. तालुक्यांतील मोठ्या गांवांत सरकारी दवाखाने असतात. अशा दवाखान्यांतून गोरगरिबांस औषध फुकट मिळतें.

कित्येक तालुक्यांतील सरकारी जंगलें व कुरणें राखलेलीं असतात. त्यांची व्यवस्था राखण्याकरितां एक कामगार असतो, त्यास फारेस्ट-रेंजर म्हणतात. त्याच्या मदतीस राउंड-गार्ड म्हणजे देखरेख करणारे कामगार व शिपाई असतात.

तसाच प्रत्येक तालुक्यांत देवी काढणारा एक कामगार असतो, त्यास व्याक्सिनेटर किंवा देवीडाक्टर म्हणतात.

प्रत्येक तालुक्यांत ह्याप्रमाणें कामगार व नौकर असतात. सर्व कामगारांनीं व नौकरांनीं आपापलीं कामें खरेपणानें व हुशारीनें करावीं, असा सरकाराचा हुकूम असतो.

## ४९. तालुका, जिल्हा व भाग.

आपण राहण्यासाठीं जीं घरें बांधितों, त्यांत लहान मोठ्या खोल्या असतात. घरास खोल्या असल्या, म्हणजे सामान-सुमान नीटनेटकें ठेवितां येतें, व घरांतील माणसांच्या निजण्या-बसण्याची चांगली सोय होते. गांवांत व शहरांत कोणतें घर कोठें आहे, हें कळावें म्हणून गांवाचे व शहराचे भाग पाडितात. अशा भागांस पेठा किंवा आळ्या म्हणतात. पेठ मोठी असली तर तिचे पोटभाग कल्पितात, व त्यांस निरनिराळीं नांवें देतात.

अनेक लहान मोठीं अशीं सुमारें शंभर गांवें मिळून एक तालुका होतो, जवळ जवळचे अनेक तालुके मिळून जो मुलूख होतो, त्यास जिल्हा म्हणतात. घरें, गांवें व शहरें ज्याप्रमाणें लहान मोठीं असतात, त्याप्रमाणें जिल्हेही लहान मोठे असतात. कित्येक जिल्ह्यांत कमी व कित्येकांत जास्त तालुके असतात.

जिल्ह्यांतील तालुक्यांची संख्या अमुकच अशी कायम ठरलेली नसते. ती संख्या योग्य कारणामुळें सरकार कमजास्त करितें. साधारणपणें जिल्ह्यांत ७ पासून १० पर्यंत तालुके असतात. पांच सहा जिल्हे मिळून जो प्रदेश होतो, त्यास भाग म्हणतात. ज्या प्रदेशास मुंबई इलाखा म्हणतात त्यांत असे चार भाग आहेत.

जिल्ह्याची सर्व व्यवस्था ज्या अधिकाऱ्याकडे असते, त्यास कलेक्टर म्हणतात. तालुक्याचे अधिकारी मामलेदार ह्यांस कलेक्टराच्या हुकमाप्रमाणें वागावें लागतें. कलेक्टर हा जिल्ह्याचा

राजा आहे, असें म्हटलें तरी चालेल. कलेक्टर व त्याच्या हाताखालचे इतर कामगार ह्यांवर देखरेख करण्याकरितां एक अधिकारी असतो. त्याच्या ताब्यांत पांच सहा जिल्हे मिळून झालेला एक भाग असतो. त्या अधिकाऱ्यास कमिशनर म्हणतात.

कमिशनर हा एक सबंध भागावरचा अधिकारी आहे खरा, तरी तो व कलेक्टर ह्यांच्या अधिकारांत मोठा फरक आहे. कलेक्टर व त्याच्या हाताखालचे जिल्ह्यांतील इतर कामगार ह्यांवर देखरेख करणें, व त्यांच्या कामास आळा घालणें, हेंच काय तीं कमिशनराचीं कामें असतात. पण कलेक्टराचे अधिकार फार मोठे असतात. कलेक्टर हा सरकाराचे हुकूम बजावणारा व रयतेच्या बऱ्या वाईट स्थितीकडे पाहणारा अधिकारी होय. मामलेदारांस हुकूम देऊन त्यांजकडून त्यास सरकारी कामें करवून घ्यावीं लागतात. मामलेदारामार्फत कलेक्टराचा हुकूम खेडेगांवचे पाटील कुळकर्णी ह्यांस पोहोंचतो, व ते त्या हुकमाप्रमाणें सर्व कामें करितात. प्रत्येक भागांत विद्याखात्याची देखरेख करण्याकरितां एक अधिकारी असतो, त्यास एज्युकेशनल इन्स्पेक्टर म्हणतात.

कमिशनराच्या देखरेखीखालीं असलेल्या जिल्ह्यांतील लोक बहुतकरून एकच मुख्य भाषा बोलतात. त्या भाषेशिवाय त्या भागांत इतर कित्येक भाषा बोलणारे लोक असतात; पण सरकारी कामें बहुधा ज्या त्या भागांतील मुख्य भाषेंतच चालतात.

ज्या प्रदेशास मध्य भाग म्हणतात त्यांत पुणें, सातारा,

सोलापूर, अहमदनगर, नाशीक, व खानदेश असे सहा जिल्हे आहेत. ह्या प्रत्येक जिल्ह्यांत कमजास्त तालुके आहेत. आकारानें व लोकसंख्येनें खानदेश जिल्हा हा सर्वांत मोठा आहे व सोलापूर जिल्हा हा सर्वांत लहान आहे. ह्या सर्व जिल्ह्यांत मराठी भाषा बोलतात. त्याप्रमाणेंच उत्तर भागांतील ठाणें जिल्ह्यांत, आणि दक्षिण भागांतील कुलाबा व रत्नागिरी ह्या जिल्ह्यांतही, मराठी भाषाच चालते.

---

## ५०. जिल्ह्यांतील अधिकारी व त्यांचीं कामें.

नाशीक जिल्ह्यांत मालेगांवीं डोंगरसिंग ह्या नांवाचा एक रजपूत गृहस्थ राहात असे. त्या विभागाचे असिस्टंट कलेक्टर ह्यांच्या कचेरींत तो शिरस्तेदार होता. त्याची हुशारी पाहून नाशिकचे कलेक्टर ह्यांनीं त्यास आपल्या कचेरींत बढतीच्या जागीं नेमिलें. त्यामुळें डोंगरसिंगास मालेगांव सोडून नाशिकास जावें लागलें.

डोंगरसिंगास रामसिंग नामें एक तेरा चौदा वर्षांचा मुलगा होता. तो स्वभावानें मोठा चौकस होता. नाशिकास गेल्यावर तो एके दिवशीं आपल्या बापाबरोबर कचेरीस गेला. तेथें कचेरींतील सर्व व्यवस्था व कारकुनांची गर्दी पाहून त्यास नवल वाटलें, व तो आपल्या बापास म्हणाला, "बाबा, ह्या कचेरींत एवढे कारकून कां बरें आहेत? एथें काम फार असावें!"

डोंगरसिंग—मालेगांवच्या कचेरींत केवळ दोन तीन तालुक्यांचें काम चालतें, पण ह्या कचेरींत बारा तालुक्यांचें, म्हणजे सगळ्या नाशीक जिल्ह्याचें काम चालतें; म्हणून एथें

अधिक कारकून आहेत. ह्या कचेरीस कलेक्टर कचेरी म्हणतात.

रामसिंग—कलेक्टर साहेब स्वतां कोणतीं कामें पाहतात?

डोंगरसिंग—जिल्ह्यांतील सर्व कामांवर कलेक्टर साहेबांची देखरेख असते. जमिनीचा धारा व इतर कर वसूल करण्याकडे त्यांस विशेष लक्ष द्यावें लागतें. [illegible] मोठ्या फौजदारी [illegible]ल्यांची चौकशी ते करितात. जिल्ह्यांत कोठें गडबड अथवा दंगा झाला, तर तो मोडून टाकण्याची व्यवस्था त्यांस पाहावी लागते. कलेक्टर साहेबांस मदत करण्यासाठीं त्यांच्या हाताखालीं असिस्टंट कलेक्टर व डेप्युटी कलेक्टर असे कांहीं कामगार असतात. त्यांच्या मदतीनें सर्व जिल्ह्याचें काम त्यांस पाहतां येतें.

रामसिंग—मोठ्या गुन्ह्यांची चौकशी कोण करितो?

डोंगरसिंग—बहुधा प्रत्येक जिल्ह्यांत खून, दरोडे वगैरे अशा मोठ्या गुन्ह्यांची चौकशी करण्याकरितां सेशन-जज्ज ह्या नांवाचा एक अधिकारी असतो. जज्ज हा कलेक्टराच्या देखरेखीखालीं नसतो. जज्जास मदत करण्याकरितां असिस्टंट जज्ज असतात.

रामसिंग—काल तुम्ही कोणत्या साहेबाच्या बंगल्यावर गेलां होतां?

डोंगरसिंग—ते साहेब ह्या जिल्ह्याचे डाक्टर आहेत. त्यांस सिव्हिल सर्जन म्हणतात. ह्या शहरांत एक इस्पितळ आहे, त्यांत आजारी मनुष्यांस ठेवून त्यांस औषधपाणी देतात.

तालुक्यांतील मोठमोठ्या गांवांत दवाखाने असतात. इस्पितळ व दवाखाने ह्यांवर सिव्हिल सर्जन ह्यांची देखरेख असते.

रामसिंग—बाबा, एंजिनियर म्हणजे कोण असतो हो? माझ्या वर्गांत एक मुसलमानाचा मुलगा आहे, त्याला सगळे एंजिनियरचा मुलगा म्हणतात.

डोंगरसिंग—रस्ते, कालवे, सरकारी इमारती, वगैरे कामें एंजिनियरास पाहावीं लागतात. आपल्या जिल्ह्याचे हल्लींचे एंजिनियर हे मुसलमान आहेत.

रामसिंग—परवां कलेक्टर साहेबांबरोबर तुम्ही इगतपुरीस कशाला गेलां होतां?

डोंगरसिंग—इगतपुरीजवळील एका खेड्यांत कांहीं डोंगरी लोकांनीं दंगा सुरू केला होता; तेव्हां कलेक्टर साहेब व पोलीस सुपरिंटेंडेंट ह्यांबरोबर मी गेलों होतों. दरोडखोर, खुनी, भामटे, अशा गुन्हेगारांवर पोलीसची नेहमीं नजर असते.

रामसिंग—आणखी कोणते अधिकारी ह्या जिल्ह्यांत आहेत?

डोंगरसिंग—सरकारी जंगलें व कुरणें ह्यांवर देखरेख करण्याकरितां, फारेस्ट म्हणजे जंगल खात्याचा एक अधिकारी असतो. ह्या शहरांत जी एक मोठी इंग्रजी शाळा म्हणजे हायस्कूल आहे, त्या शाळेचे हेडमास्तर, व जिल्ह्यांतील शाळा तपासणार डेप्युटी इन्स्पेक्टर हे दोन विद्याखात्याचे अधिकारी आहेत. ह्यांशिवाय जिल्ह्यांत इतर कित्येक खात्यांचेही अधिकारी आहेत. अशी जिल्ह्याची व्यवस्था सरकार उत्तम प्रकारें ठेवितें.

---

# भाग तिसरा.

## सृष्टिज्ञान आणि पदार्थवर्णन.

### ६१. पाणी.

"बाबा, आज गुरुजींनीं आम्हांला पाण्याविषयीं मोठी मजेदार माहिती सांगितली !"

"काय म्हणतोस, हरी, पाण्याविषयीं माहिती सांगितली ? सांग पाहूं त्यांनीं काय काय सांगितलें तें ?"

हरी—गुरुजी म्हणाले, पाऊस पडला म्हणजे रस्त्यांत व शेतांत उंच जागेकडून सखल जागेकडे पाणी कसें वाहात जातें, तें आपण पाहतोंच. डोंगरावर पाऊस पडतो तेव्हां तेथून पाण्याचे लोट खालीं वाहात येतात. ते एकमेकांस मिळून त्यांच्या ओहोळ्या होतात; ओहोळ्यांचे नाले, नाल्यांचे ओढे व ओढ्यांच्या नद्या होतात; आणि त्या समुद्रास जाऊन मिळतात.

बाप—उंचवट्याकडून सखल जागेकडे पाणी वाहात जातें, म्हणूनच नद्यांचे उगम डोंगरांतून असतात. बरें पुढें ?

हरी—पावसानें डोंगर व टेकड्या धुपतात, व त्यांजवरील माती वाहात येऊन नदींत मिसळते. त्यामुळें नदीचें पाणी पावसाळ्यांत गढूळ असतें. पावसाच्या पाण्यानें नदीला पूर येतो. नदीचें पाणी ओसरूं लागलें, म्हणजे तिच्या कांठीं गाळ सांचतो; व त्यामुळें नद्यांच्या कांठची जमीन मऊ व पिकाऊ असते. कांहीं गाळ नद्यांच्या ओघांबरोबर समुद्रांत जाऊन पडतो.

**बाप**—होय, ह्याप्रमाणें डोंगरचे डोंगर धुपून जातात, व लाखों खंडी माती दरवर्षी वरून खालीं वाहात येते !

हरी—पावसाचें बहुतेक पाणी नद्यांनीं वाहात जाऊन समुद्रास मिळतें; पण कांहीं जमिनींत मुरून झऱ्यांच्या रूपानें बाहेर पडतें. आपण विहिरी खणल्या, म्हणजे त्यांतही पाण्याचे झरे लागतात.

बाप—पाणी पातळ असतें; पण तें कधीं कधीं दुसऱ्याही स्थितींत असतें, ह्याविषयीं गुरुजींनीं तुम्हांला कांहीं सांगितलें आहे काय ?

हरी—होय तर ! पाणी गोठून तें अतिशय गार व घट्ट होतें. त्याला बर्फ म्हणतात. कधीं कधीं ढगांतून पावसाचे थेंब खालीं पडत असतां, ते गोठून बर्फाच्या घट्ट गोळ्यांप्रमाणें खालीं येतात; त्यांना गारा म्हणतात. थंड देशांत मोठमोठीं सरोवरें व नद्या ह्यांचें पाणी गोठून इतकें घट्ट होतें कीं, त्यावरून माणसें गाड्या, जनावरें इत्यादिकांस जातां येतें.

बाप—ह्याशिवाय आणखी एकाद्या स्थितींत पाणी असतें काय ?

हरी—गुरुजी म्हणाले कीं, इंग्लंड सारख्या थंड देशांत, पाऊस पडतांना त्याचें पाणी हळूहळू गोठत असतें; पण तें गारांइतकें घट्ट होत नाहीं. पांढऱ्या परांसारख्या मऊ व पातळ थरांच्या रूपानें तें खालीं उतरतें, व जमीन, झाडें, झुडपें सर्व कांहीं झाकून टाकितें; जणू काय त्यांवर पांढरें आच्छादनच पसरलें आहे ! त्याला हिम म्हणतात. हिम आपल्या देशांत हिमालयावर मात्र पडतें.

बाप—भांड्यांत पाणी तापतांना तूं पाहिलें आहेस. त्या पाण्याचें काय होतें तें गुरुजींनीं सांगितलें आहे काय ?

हरी—होय. पाणी जर खूप तापविलें, तर तें विरळ व हलकें होऊन हवेंत तरंगूं लागतें; तेव्हां त्याला वाफ म्हणतात. सूर्याच्या उष्णतेनें पृथ्वीच्या पृष्ठभागावरील पाणी ह्याप्रमाणें तापतें, व त्याची वाफ होऊन आभाळांत जाते. तेथें तिचे ढग बनतात, व त्यांतून पाऊस पडतो.

बाप—ठीक. ढगांतून पाऊस, पाण्याची वाफ, वाफेचे ढग व ढगांचा पुन्हा पाऊस, असें हें चक्र नेहमीं चालू आहे. बरें, समुद्रांत एवढें गोडें पाणी जात असून त्याचें पाणी खारें असतें, हें तुम्हांला सांगितलें आहे काय ?

हरी—होय, सांगितलें आहे, आणि तें खारें कां असतें तेंही सांगितलें आहे.

## ९२. विस्तव.

गुरुजी—मुलांनो, मेणबत्ती अगर दुसरा कोणताही पदार्थ जळत राहण्याला कशाची जरुरी आहे ?

रामा—कशाची जरुरी दिसत नाहीं. फार तर लाकूड किंवा कोळसा विझावयास लागला, म्हणजे पुन्हा जोरानें पेटण्यास त्याला फुंकणीनें अगर पंख्यानें वारा घालावा लागतो.

गुरुजी—वारा म्हणजे काय ?

रामा—हवा हालूं लागली म्हणजे तिला वारा म्हणतात.

गुरुजी—तर मग जळण्याची क्रिया चालण्यास हवेची जरुरी आहे.

रामा—मेणबत्ती जळण्यास आपण वारा घालीत बसत नाहीं. ह्यावरून मेणबत्तीला हवेची जरुरी आहेसें वाटत नाहीं.

गुरुजी—ह्या रुंद तोंडाच्या शिशांत एक मेणबत्ती जळत ठेवून, त्याचें तोंड बंद करतों. पाहा, जोत जात चालली. आतां तर अगदींच गेली. मेणबत्ती कांहीं वेळ जळत राहून मग कां बरें गेली?

अली—शिशांत थोडी हवा होती, ती जोतीनें जळण्याकरितां घेतली; व दुसरी चांगली हवा न मिळाल्यामुळें जोत गेली असावी.

गुरुजी—शाबास! तुला समजलें. आपणांला पेटींत कोंडिलें म्हणजे आपला जीव गुदमरतो, ह्यावरून आपणांला हवेची जरुरी आहे असें होतें; तशीच जळण्याची क्रिया चालण्यास हवेची जरुरी आहे. कांहीं पदार्थ जळत असले म्हणजे त्यांपासून जोत निघते, जसें मेणबत्ती, तेलाचे दिवे वगैरे; पण कांहीं पदार्थ जळत असतां लाल होतात, तरी त्यांपासून जोत निघत नाहीं; जसें लोखंड, कोळसा वगैरे. विस्तवाचा आपणांस काय उपयोग होतो तें सांगा पाहूं?

रामा—तेलाचा दिवा अगर मेणबत्ती पेटविण्यास विस्तव लागतो.

अली—अन्न शिजविण्यास, पाणी तापविण्यास, थंडीच्या दिवसांत शेकण्यास, विस्तवाची अत्यंत जरुरी आहे.

गुरुजी—शिवाय आगगाड्या, गिरण्या वगैरे विस्तवाशिवाय चालावयाच्या नाहींत. बरें, विस्तव कसा तयार करतात?

रामा—आगकाडी पेटवून विस्तव तयार करतात.

गुरुजी—अलीकडे आपणांस आगकाड्या माहीत झाल्या. पण त्या माहीत होण्यापूर्वीं विस्तव कसा तयार करीत असत?

अली—गारगोटीवर पोलाद झाडून शेतकरी लोक तंबाखू ओढण्यास अजूनही विस्तव पाडितात. तसाच पूर्वी तयार करीत असतील.

गुरुजी—लाकडावर लाकूड घासूनही विस्तव उत्पन्न होतो. अरण्यांत मोठ्या सोसाट्याच्या वाऱ्यानें एका झाडाच्या फांद्या दुसऱ्याच्या फांद्यांवर घासून विस्तव निघतो, व त्यानें अरण्यांत वणवे लागतात.

---

## ६३. मीठ.

गोविंदास साखर व गूळ हीं फार आवडत असत. त्याला गोड पदार्थ खाण्याचा कधींही कंटाळा नसे.

एके दिवशीं त्याचा बाप त्यास म्हणाला, "गोविंदा, तूं रोज साखर फार खातोस, आतां कांहीं दिवस तिच्याऐवजीं मीठ खाण्याचा बेत कर पाहूं!"

गोविंदा—मीठ! बाबा, तें नाहीं माझ्यानें होणार; मला नाहीं मीठ आवडत.

बाप—मीठ तुला नुसतें खाववणार नाहीं हें खरें, पण तें तुला आवडत नाहीं असें कसें म्हणतोस? अरे, साखरेपेक्षां तुला मीठ किती अवश्य आहे व रोज तें तुझ्या खाण्यांत किती येतें ह्याचा विचार कर.

गोविंदा—होय, मी जेवतांना रोज भातांत मीठ घालितों. तसेंच भाजी, आमटी वगैरे पदार्थांत मीठ घालितात. मीठ न घातलें, तर ते पदार्थ फार बेचव लागतील व खाववणार नाहींत.

बाप—तर मग तुझें मिठाशिवाय चालावयाचें नाहीं?

**गोविंदा**—नाहीं, एक दिवससुद्धां चालेल असें मला वाटत नाहीं.

**बाप**—मीठ राजापासून रंकापर्यंत सर्वांस पाहिजे. सहा सहा महिने साखरेचें दर्शन ज्यांस नाहीं, अशीं शेंकडों माणसें सांपडतील; पण एक दिवस मिठाची गरज लागली नाहीं, असें एक देखील माणूस सांपडावयाचें नाहीं. माणसांनाच काय पण जनावरांना देखील मिठाची जरूरी आहे. म्हणून गुरांना रोज थोडें थोडें मीठ देत जावें. मिठानें रक्त शुद्ध होतें, व प्रकृति चांगली राहते. बरें, गोविंदा, मीठ आपल्या खाण्यांत येतें, ह्याशिवाय मिठाचा आणखी काय उपयोग करितात तें तुला ठाऊक आहे?

**गोविंदा**—होय, बाबा. पदार्थ नासूं नयेत म्हणून त्यांत मीठ घालितात. आपल्या घरीं लोणच्यांत मीठ घालितात. तसेंच मास, मासे, वगैरे पदार्थ पुष्कळ दिवस टिकावे व कुजून जाऊं नयेत, म्हणून त्यांत मीठ घालून ठेवितात, असें गुरुजींनीं एकदां वर्गांत सांगितलें होतें.

**बाप**—होय, असे मिठाचे अनेक उपयोग आहेत. बरें, हें मीठ कोठून येतें ?

**गो[illegible]**—[illegible], [illegible] पाणी फार खारट असतें, असें मी पुस्त[illegible] [illegible]. [illegible] खारट पाण्यापासून मीठ का[illegible] [illegible], असें मला वाटतें. पण तें कसें काढितात तें मला माहीत नाहीं.

बाप— समुद्राच्या कांठीं वाफ्यां सारख्या वीतभर खोलीच्या पुष्कळ कुंड्या करितात. त्यांत भरतीच्या वेळीं समुद्राचें पाणी



धरून ठेवितात. तें आटलें म्हणजे खालीं मिठाचे बारीक बारीक खडे चमकूं लागतात. ते लाकडी पावड्यानें गोळा करून त्यांचे ढीग बांधांवर घालून ठेवितात. असा मीठ पिकविण्याचा कारखाना ज्या जागीं असतो, त्या जागेस **मिठागर** म्हणतात. असे मिठागर कुरलें, उरण, वसई, पेण एथें फार आहेत. कच्छाच्या रणांत व सिंध प्रांतामध्यें, कांहीं ठिकाणीं जमिनीच्या पृष्ठभागावर मीठ सांचून, तो भाग इतका खारवट झाला आहे कीं, तेथें गोडें पाणी मिळण्याची मोठी पंचाईत पडते. त्या ठिकाणीही पुष्कळ मीठ पिकतें. पंजाबांत मिठाच्या खाणी आहेत, त्यांतूनही दरवर्षीं पुष्कळ मीठ बाहेर काढितात.

## ५४. गंधक.

शामराव हे आगकाड्यांच्या कारखान्यांत नौकर होते. त्यांनीं कारखान्यांतून मुलांस दाखविण्याकरितां कांहीं गंधकाचे तुकडे आणिले होते. ते त्यांचा धाकटा मुलगा, विसू, ह्यानें पाहिले, व "अण्णा, हें काय आणिलें आहे ?" असें त्यानें शामरावांस विचारिलें.

शामराव म्हणाले, "विसू, हे गंधकाचे तुकडे आहेत. गंधक कसा असतो हें तुम्हांस दाखविण्याकरितां मीं ते मुद्दाम आणिले आहेत. विसू, हा तुकडा वांकव पाहूं ?"

विसू तुकडा वांकवूं लागला, तों तो मोडला. तेव्हां तो म्हणतो, "अण्णा, हा पदार्थ कांचेसारखा ठिसूळ दिसतो."

शामरावांनीं दुसरा तुकडा घेऊन त्यावर हातोड्यानें घाव मारिला. त्याबरोबर त्याचे तुकडे तुकडे झाले, व त्यांतला एक तुकडा जवळच्च एका भांड्यांत पाणी होतें त्यांत उडाला. तें शामरावांची मुलगी, चंपी, हिनें पाहिलें. तेव्हां तो साखरेसारखा पाण्यांत विरघळतो कीं काय, हें पाहण्याकरितां ती भांड्याजवळ गेली. पण तो विरघळला नव्हता, म्हणून एका काडीनें तें पाणी तिनें पुष्कळ ढवळिलें, तरी तो विरघळेना, किंवा लहान होईना.

शामराव म्हणाले, "चंपे, दमलीस, पुरे कर. तो खडा कांहीं विरघळावयाचा नाहीं."

नंतर शामरावांनीं आणखी एक तुकडा चिनी मातीच्या पेल्यांत टाकून, त्याच्या खालीं दिवा धरिला; व "ह्या तुकड्याचें काय होतें तें पाहा," म्हणून मुलांस सांगितलें.

मुलें पाहूं लागलीं, तों तो तुकडा हळू हळू वितळूं लागला; व तो जसजसा वितळूं लागला, तसतसा त्याचा पूर्वींचा पिवळा रंग बदलत जाऊन, अखेर त्यास तांबूस रंग आला.

शामरावांनीं त्या पेल्यांतील पातळ झालेला गंधक दुसऱ्या पेल्यांत पाणी घालून त्यांत ओतला. मग तो बाहेर काढून ते म्हणाले, "आतां पाहा हा किती मऊ झाला आहे! ह्याला आतां वाटेल तो आकार देतां येईल."

चंपी म्हणाली, "पण, अण्णा, ह्या पहिल्या पेल्यांत शिल्लक राहिलेला गंधकाचा रस पाहा. तो आतां पुन्हा कसा घट्ट झाला आहे! आणि त्यावर चढलेला तांबूस रंग नाहींसा होऊन, तो आतां पूर्वींप्रमाणें पिवळा झाला आहे!"

शामराव म्हणाले, "वितळलेला गंधक थंड झाला, म्हणजे तो पुन्हा पहिल्यासारखा होतो."

शामरावांनीं तो पेला पुन्हा दिव्यावर धरिला; तों गंधक वितळूं लागला, व कांहीं वेळानें अगदीं काळा पडला, व त्यांतून हिरवट तांबूस अशी वाफ निघूं लागली; व लागलाच त्या वाफेनें पेट घेतला. त्या जोतीचा रंग निळसर होता.

विसू—अण्णा, आगकाडीच्या टोंकाच्या जरा मागें जें पिवळें असतें, तो गंधकच ना? तो तेथें कशासाठीं लावितात?

शामराव—हो, तो गंधकच. गंधक किती लवकर पेट घेतो तें तुम्हीं नुकतेंच पाहिलें आहे. हा लवकर पेट घेणारा आहे, म्हणून काडीस लावितात. बरें, चंपे, तुझ्या वेणींतलें तें गुलाबाचें फूल इकडे आण पाहूं. मी तें गंधकाच्या वाफेवर धरतों.

पाहा, त्याचा रंग जाऊन तें पांढरें झालें. गंधकाच्या अंगीं रंग घालविण्याचा गुण आहे, म्हणून लोंकर, रेशीम वगैरे पदार्थांचा रंग घालविण्यास त्याचा उपयोग होतो, मघां गंधकाचा तुकडा फोडिला तेव्हां त्याचे तुकडे तुकडे झाले. पण ते सर्व एकासारखे एक असे झाले. ह्यांसच गंधकाचे स्फटिक म्हणतात. स्फटिकांविषयीं माहिती तुम्हांला पुढें होईल.



गंधकाचे स्फटिक.

---

## ५९. स्फटिक.

हा पाहा कांचेचा लोलक. हा पेटीच्या आकाराचा आहे. ह्याला सहा बाजू आहेत; ह्या चोहींकडल्या चार, ही वरची एक आणि ही खालची एक. ह्या बाजूंना पैलू म्हणतात. ह्याला एकंदर बारा कडा आहेत. मोजून पाहा.

हा मिठाचा खडा बघा. हा त्या लोलकापेक्षां लहान आहे खरा, पण अगदीं त्यासारखा आहे; म्हणजे ह्यालाही सहा पैलू आणि बारा कडा आहेत. नीळ आणि माणीक म्हणून जीं रत्नें असतात, त्यांचाही मूळचा आकार असाच असतो.

बरें, हा शिरगोळ्याचा खडा घ्या. ह्यालाही सहा पैलू व बारा कडा आहेत. पण हा खडा आणि मिठाचा खडा ह्यांच्यांत

थोडा फरक आहे. हा लोलक अगर हा मिठाचा खडा मेजावर ठेविला म्हणजे सरळ उभा राहतो; पण एखाद्या पडक्या घराची भिंत जशी कललेली असते, तसा हा शिरगोळ्याचा खडा सरळ उभा न राहतां, एका आंगाला कललेला असतो. खडीसाखरेचा खडा शिरगोळ्याच्या खड्यासारखाच असतो.

आतां हा पाहा कांचेचा दुसरा लोलक. ह्याला आठ पैलू आहेत, पण कडा बाराच आहेत. ह्याच्या सर्व बाजू तिकोनी आहेत. पण पाहिल्या लोलकाच्या बाजू चौकोनी आहेत. हा लोलक कारल्याच्या आकारासारखा, म्हणजे मध्यें जाडा व टोंकांला निमुळता असा, आहे. मात्र कारल्याला कडा नसतात व ह्याला आहेत. आतां हा बघा तुरटीचा खडा. हा अगदीं ह्या लोलकासारखा आहे, म्हणजे ह्यालाही आठ पैलू व बारा कडा आहेत. हिऱ्याचा मूळचा आकार असाच असतो. मीठ, तुरटी, खडीसाखर, शिरगोळा ह्यांचे लहान मोठे केवढेही खडे घेतले, तरी त्यांच्या आकारांत बदल होत नाहीं. हा



खडीसाखरेचे स्फटिक.

पाहा मी शिरगोळ्याचा खडा फोडितों. ह्याचे तुकडे तुकडे झाले, पण त्यांचाही आकार मोठ्या शिरगोळ्याप्रमाणेंच आहे. ज्या पदार्थाला असे ठरावीक आकार असतात, व जो फोडिला

तरी त्याच्या तुकड्यांच्या आकारांत फरक होत नाहीं, त्या पदार्थाला स्फटिक म्हणतात. मीठ, तुरटी, खडीसाखर, हिरे, माणिकें, वगैरे पदार्थ स्फटिकच होत. ते फोडिले तरी त्यांच्या छकलांचे आकार बदलत नाहींत.

हे काचेचे दोन्ही लोलकही स्फटिकच असावे, असें तुम्हांस वाटलें असेल; पण ते स्फटिक नव्हत, असें आपण ते फोडून पाहिले म्हणजे समजेल. हे पाहा त्यांचे तुकडे कसे तरी वांकडे तिकडे झाले! त्यांचा आकार मूळच्या लोलकांसारखा बिलकूल नाहीं. काच हा पदार्थ वाळूमध्यें कांहीं मिसळून कृतीनें तयार करितात. स्फटिक तसे कृत्रिम नाहींत; ते आपोआप नियमित आकाराचे बनतात.

स्फटिकांच्या मोठ्या खड्यांचे बारीक बारीक तुकडे आपण करूं शकतों, तसेच बारिकांपासून मोठेही खडे आपणांला करतां येतात. हे एथें तीन पेले आहेत. ह्यांत कढत पाणी ओतितों, व प्रत्येकांत एकेक दगड लोंबता राहील असें करितों. एकांत खडीसाखरेची पूड, दुसऱ्यांत मिठाची पूड व तिसऱ्यांत तुरटीची पूड टाकितों. आणखी एका तासानें तुम्ही पाहा, म्हणजे तुम्हांला ह्या दगडांवर मोठमोठे स्फटिक चिकटलेले दिसतील. हा तुरटीचा खडा ह्याप्रमाणेंच तयार केला आहे. साधारण बाजारांत जी तुरटी मिळते ती स्फटिकाकृति नसते.

बरें, मुलांनो, स्फटिक म्हणजे काय हें तुम्हांला आज समजलें. आपल्या रानांत शिरगोळ्याचे दगड व दुसरे स्फटिकाकृति दगड पुष्कळ सांपडतात. तुम्ही तिकडे फिरावयास गेलां म्हणजे असे दगड सांपडतील ते घेऊन या. मग ते कोणत्या प्रकारचे स्फटिक आहेत तें आपण पाहूं.

## ५६. लोखंड व पोलाद.

जुन्या कुदळीचें टोंक मोडलें होतें, म्हणून बागेकरितां नवीनच कुदळ आणावी लागली. जुनी बापानें कादराजवळ दिली आणि म्हटलें, "कादर, शेजारच्या घिसाड्याचा मुलगा, मोहन, तुझा मित्र आहे ना? त्याजकडे जा, म्हणजे तो ही कुदळ नीट करून देईल. मग हिचा तुला उपयोग करतां येईल."

कादर मोहनाकडे गेला, व त्यानें त्यास "कुदळीचें टोंक नीट करून देतोस का?" म्हणून विचारिलें.

मोहनानें त्याला आपल्या दुकानांत नेलें. तेथें भट्टी पेटलेलीच होती. मोहनानें कुदळीचें टोंक विस्तवांत घालून कादरास भाता हालविण्यास सांगितलें. टोंक लाल झाल्यावर मोहनानें तें भट्टींतून काढून, ऐरणीवर ठेवून, हातोड्यानें ठाकून नीट केलें. लोखंड तापविलें म्हणजे मऊ होतें, व मग त्याला हवें तसें वाढवितां व वाकवितांही येतें, हें कादरानें पाहिलें. तेव्हां तो म्हणाला, "मोहन, लोखंड तापविलें नाहीं, तर तें अगदीं वांकत नाहीं काय?" तेव्हां मोहनानें त्याला एक लोखंडी कांब दिली, आणि, "हिच्यावर घणानें ठोके मार पाहूं?" असें म्हटलें. कादरानें त्यावर कांहीं घाव घातले तों ती जरा वांकली व पसरली, पण तापविलेल्या लोखंडाप्रमाणें पाहिजे तशी वांकवितां आली नाहीं

मोहन म्हणाला, "पावडें, पहार, कुलपें, सारवळ्या, खिळे वगैरे जिनसा ज्या एथें दिसतात, त्या सर्व घडींव लोखंडाच्याच आहेत. घडींव लोखंड मऊ असतें. पण पाण्याच्या नळ्या,

बांकांचे पाय, वगैरे जिनसा ज्या लोखंडाच्या करितात, तें लोखंड ठिसूळ असतें. त्या नळीवर जर तूं घाव मारशील तर तिचे तुकडे होतील. अशा लोखंडास ओतींव लोखंड म्हणतात."

नंतर मोहनानें कादराजवळ एक करवत दिला, आणि त्याला तो वांकविण्यास सांगितलें. त्यानें तो पुष्कळ वांकविला, तरी तो मोडला नाहीं. म्हणून कादरानें मोहनास विचारिलें, "हा मोडल्याशिवाय इतका कसा वांकतो ?" मोहनानें उत्तर दिलें, "हा पोलादाचा केलेला आहे. चाकू, कातऱ्या, विळे, सुताराचीं सर्व हत्यारें, घड्याळाच्या कमानी, कानशी, वगैरे पदार्थ पोलादाचे करितात. पोलाद हें ओतींव किंवा घडींव-लोखंडापासून करितात."

मोहनानें कादराला एक कानस दिली, आणि त्याला एक लोखंडी कांब व पाण्याच्या नळीचा तुकडा कानसण्यास सांगितलें. कादर घासूं लागला तों त्या दोहोंचाही कीस पडूं लागला; पण कानस जशीच्या तशीच! ह्यावरून कादराच्या लक्षांत आलें कीं, पोलाद हें घडींव व ओतींव लोखंडापेक्षां कठीण असतें.

नंतर मोहनानें कादराच्या हातांत एक दगड दिला. तो फार जड होता. कादरानें विचारिलें, "हें काय आहे ?"

मोहन म्हणाला, "हा लोखंडाचा दगड आहे. लोखंड खाणींतून काढितात तेव्हां तें असें असतें, हें तुला माहीत असेलच ! ह्या दगडांत लोखंड व माती वगैरे दुसरे पदार्थ मिसळलेले असतात. ते पदार्थ, हे दगड भट्टींत घातले म्हणजे, जळून जातात, व शुद्ध लोखंडाचा रस होतो. रस थंड झाला म्हणजे त्याला ओतींव लोखंड म्हणतात."

"ओतींव लोखंड भट्टींत तापवून त्यावर घणानें घाव मारिले, म्हणजे त्याचें घडींव लोखंड होतें. तें पुन्हा पुन्हा भट्टींत तापवून, ठोकून, थंड पाण्यांत बुडवीत गेलें, म्हणजे त्याचें पोलाद होतें."

---

## ५७. वनस्पतींचीं इंद्रियें व त्यांचे व्यापार.



गुरुजी—मुलांनो, तुम्हांस झाडांविषयीं काय माहिती आहे, तें पाहण्याकरितां आज तुम्हांला बागेंत आणिलें आहे. केशव, झाडाचे मुख्य भाग कोणते ?

केशव—मूळ, खोड, पानें व फुलें हे झाडाचे मुख्य भाग.

नारायण—आणि खांद्या हा एक भाग नाहीं का ?

माधव—नारायण, सर्वच झाडांना खांद्या असतात असें नाहीं. ह्या कर्दळीला व त्या पोफळीला खांद्या कोठें आहेत ?

गुरुजी—खांद्या ह्या झाडाचे मुख्य भाग नाहींत. त्या खोडाच्याच पोटांत येतात. बरें, गोविंदा, मुळांचा झाडांना काय उपयोग होतो ?

गोविंदा—मुळें जमिनींत खोल जातात, व त्यामुळें झाडें जमिनीस धरून राहतात.

गुरुजी—आणखी त्यांचा मोठा उपयोग आहे तो हा.

मुळांस पाळें असतात. त्यांच्या शेवटीं बारीक बारीक भोंकें असतात, तीं त्यांचीं तोंडें होत. त्यांनीं तीं पाणी व त्याबरोबर आपलें अन्न शोषून घेतात. बरें, विष्णू, खोडाचा काय उपयोग?

**विष्णू**—खोड हें पानें, फुलें व फळें ह्यांचा आधार आहे.

**गुरुजी**—होय. खोडाचा दुसरा उपयोग असा आहे कीं, मुळांनीं शोषून घेतलेलें पाणी व अन्न खोडांतून पानांकडे जातें. अहमद, इंद्रियें म्हणजे काय तें तुला माहीत आहे?

**अहमद**—होय. नेमलेलें काम करणारा जो शरिराचा भाग, त्याला इंद्रिय म्हणतात. जसें, डोळा हा पाहण्याचें काम करितो, म्हणून तो पाहण्याचें इंद्रिय होय; कान हा ऐकण्याचें काम करितो, म्हणून तो ऐकण्याचें इंद्रिय होय.

**त्रिविक्रम**—मूळ हें पाणी व अन्न शोषून घेण्याचें काम करितें, तेव्हां तें झाडाचें इंद्रियच म्हटलें पाहिजे. तसेंच खोडही.

**गुरुजी**—बरोबर. त्याप्रमाणें पान हेंही झाडाचें इंद्रिय आहे. आपल्या शरिराच्या प्रत्येक इंद्रियाकडे बहुतकरून एक एकच काम सोपविलेलें असतें. पण झाडांच्या पानांकडे अनेक कामें सोपविलेलीं आहेत.

**गफूर**—तीं कोणतीं? आमच्या लक्षांत एकही येत नाहीं!

**गुरुजी**—बरें, तुम्हांस त्यांतील एक दोन कामें सांगतों. आपण पाणी प्यालों, म्हणजे तें पाणी अवश्य तें काम शरिरांत करून, आपल्या कातडीला अगदीं बारीक बारीक छिद्रें आहेत, त्यांच्या वाटे घामाच्या रूपानें बाहेर पडतें. तसेंच मुळांनीं शोषून घेतलेल्या पाण्यापैकीं निरुपयोगी झालेलें पाणी, पानाला बारीक

बारीक छिद्रें असतात, त्यांच्यावाटे बाहेर पडतें. तसेंच, आपण जसें तोंडानें अन्न खातों, त्याप्रमाणें ह्या छिद्रांनीं पानें हवेंतील एका वायूचें भक्षण करितात. ह्याप्रमाणें कातडीचें व तोंडाचेंही काम पानें करितात. बरें, झाडाचें चौथें इंद्रिय कोणतें?

श्रीधर—फुलें हें चौथें इंद्रिय.

गुरुजी—होय, फुलांचें मुख्य काम म्हटलें म्हणजे फळें तयार करणें हें होय. फळांत बिया होतात, व बियांपासून पुन्हा नवीं झाडें तयार होतात.

---

## [illegible]. [illegible] रस व गर.

रुस्तूम नांवाच्या मुलानें चित्रकलेचा अभ्यास नुकताच सुरू केला होता. पहिल्या दिवशींच त्यानें चित्रें रेखाटण्यास सुरुवात केली, तेव्हां पेन्सिलीनें कागदावर काढलेल्या रेघा त्याला रबरानें वारंवार पुसाव्या लागल्या. पेन्सिलीनें लिहिलेलें रबरानें पुसतें, हें पाहून त्याला मोठें नवल वाटलें; व रबर हा काय पदार्थ आहे? असें त्यानें आपल्या बापास विचारिलें.

बाप—रबर हा एका झाडाचा चीक आहे.

रुस्तूम—चीक! आणि तो इतका घट्ट! तो कसा काढतात?

बाप—रबराचीं झाडें नेपाळांत आहेत. त्यांच्या खोडाला खांचे पाडितात. त्यांतून दाट पिवळट चीक बाहेर येतो. तो खांच्यांखालीं बांधिलेल्या गाडग्यांत धरतात. मग उन्हांत वाळविला म्हणजे तो घट्ट होतो.

रुस्तूम—चेंडू, बाहुल्या, पायमोजांचे बंद ह्याचेच करितात काय?

बाप—होय. रबरांत पाणी शिरत नाहीं म्हणून त्याचे पावसाळी कोट, तंबू व होड्यासुद्धां करितात. बरें, रुस्तूम, दुसऱ्या एकाद्या झाडाच्या खोडांतून असा रस निघतांना तूं पाहिला आहेस ?

रुस्तूम—होय. शिंदीच्या झाडाला असेच खांचे पाडून त्यांच्याखालीं गाडगीं बांधितात; त्यांत खांच्यांतून गळणारा रस सांचतो. तसेंच ताडामाडांच्या पोई कापून त्यांतून रस काढून घेतात.

बाप—होय; पण हे रस रबराच्या चिकाइतके दाट नसतात. ह्या रसांची दारू करितात. शेराची डिरी मोडली कीं तिच्यांतून चीक निघतो, तो तूं पाहिला असशीलच. तो औषधी आहे.

रुस्तूम—बाभळीच्या खोडांवर डीक सांचतो, तो त्या झाडांतील रसच असेल, नाहीं ?

बाप—छे ! तो रस नव्हे. आपल्या आंगांतून घामाबरोबर जसा मळ बाहेर पडतो, तसा झाडांच्या रसांतून हा मळ बाहेर पडतो. त्यांचा नुस्ता मळ, पण तो आपल्या किती उपयोगी आहे बरें ?

रुस्तूम—होय. कागद चिकटविण्यास त्याचा फार उपयोग होतो. तो पौष्टिक आहे, म्हणून कोणी त्याचे लाडू करून खातात.

बाप—दुसऱ्या एका प्रकारच्या झाडापासून रस काढितात, तो आपणांला फार उपयोगी आहे. तो तुझ्या लक्षांत येतो काय?

रुस्तूम—नाहीं, तो कोणता बरें ?

बाप—अरे, ऊस तूं खातोस ना ? त्यांत रस नसतो का ?

रुस्तूम—हो हो ! माझ्या अगदीं लक्षांत आलें नाहीं. परवां

आम्ही गुऱ्हाळावर गेलों होतों, तेथें मी रगडून रस प्यालों. तेथें काहिलींत रस घालून, तो कढवून गूळ करीत होते. आम्हीं त्यावरची सायही खाल्ली. फार गोड होती ती !

बाप—रुस्तूम, कांहीं झाडांचा रस जसा आपल्या उपयोगीं पडतो तसा कांहीं झाडांचा गरही उपयोगीं पडतो. साबूदाणा हा अशा एका झाडाचा गरच आहे. त्याचीं झाडें ताडाच्या झाडासारखीं



असतात. तीं दक्षिण हिंदुस्तानांत मलबार प्रांतीं डोंगरावर होतात. हें झाड पुरें वाढलें म्हणजे तोडून त्यांतील गर काढितात, व त्याची भुकटी करून ती पाण्यांत घालून ढवाळितात. मग एका प्रकारच्या चाळणींतून ती गाळून, धुऊन स्वच्छ

करितात व वाळवितात; म्हणजे साबूदाण्याचें पीठ तयार झालें. तें तसेंच विकितात; अगर तें पाण्यांत कालवून, एका प्रकारच्या चाळणींतून चाळलें म्हणजे खालीं बुंद पडतात. ते वाळविले म्हणजे साबूदाणा तयार झाला. हा पचण्यास हलका म्हणून आजारी माणसाला खावयास देतात.

---

## ६९. गहूं व गव्हांचें पीठ.

गव्हाचें झाड हात दीड हात उंच वाढतें. तें गवताच्या वर्गांतील झाड आहे, म्हणून त्याला गवताप्रमाणेंच कांडीं असतात. गव्हाला कणसें येतात, त्यांना ओंब्या म्हणतात. त्यांत गव्हाचे दाणे असतात. कोंवळ्या ओंब्या आपण भाजून खातों. कांहीं जातींच्या गव्हांच्या ओंब्यांना कुसळें असतात, पण कांहींच्यांना तीं नसतात.



जोंधळ्याचा दाणा वाटोळा असतो; पण गव्हाचा तांदुळाप्रमाणें लांबट असून त्याला एका अंगाला खांच असते. बहुतकरून सर्व देशांत गहूं होतो. हिंदुस्तानांत तांदुळाच्या खालोखाल गव्हाचेंच पीक होतें. उत्तर हिंदुस्तानांत गहूं फार पिकतो, तितका आपल्याकडे पिकत नाहीं.

गव्हाच्या पुष्कळ जाती आहेत, पण आपल्याकडे बाजारांत काय ते दोन तीन प्रकारचेच गहूं येतात. एकाला बक्षी गहूं

म्हणतात, दुसऱ्याला खपल्या गहूं म्हणतात, आणि तिसरा पोट्या गहूं म्हणून असतो. बक्षी गहूं तकतकीत व पिवळसर असून मऊ असतो, खपल्या तांबूस व कणखर असतो, आणि पोट्याचा दाणा बुटका असतो.

हरभरा, वाटाणा, तूर ह्यांच्या दाण्यांत दोन दळें म्हणजे डाळिंब्या असतात. तशीं दोन दळें, गहूं, तांदूळ, जोंधळा, बाजरी वगैरे गवताच्या वर्गांतील जीं धान्यें आहेत, त्यांच्या दाण्यांत नसतात; ह्यास्तव त्यांना एकदळ धान्यें म्हणतात. सर्व एकदळ धान्यांमध्यें गहूं फार पौष्टिक आहे.

गहूं दळून त्यांचें पीठ करितात. तें चाळलें अगर पाखडलें म्हणजे जो भरड भाग निघतो, त्याला सांजा म्हणतात; व बारीक भागाला कणीक म्हणतात. सांजा शिजवून त्यांत गूळ किंवा साखर घालून खातात. सांजाच्या पोळ्या, घारगे वगैरे पदार्थ करितात. कणकेच्या चपात्या व पुरणपोळ्या व गुळाच्या पोळ्या करितात.

ओलवलेले गहूं दळून जें पीठ पडतें, तें फडक्यावर अगर बारीक तारेच्या चाळणींतून चाळिलें, म्हणजे सपीठ खालीं पडतें; व फडक्यावर अगर चाळणींत जो भाग राहतो, तो सुपांत घालून पाखडला, म्हणजे कोंडा निघून जाऊन बाकी राहतें त्याला रवा म्हणतात. [illegible] पुऱ्या, करंज्या, वगैरे पदार्थ करितात. कोंडा गुरांना खावयास घालितात, किंवा गरीब लोक त्यांत जोंधळ्याचें अगर दुसरें कशाचें तरी पीठ घालून त्याच्या भाकरी करितात. रव्याचे लाडू वगैरे पक्वान्नें करितात. गव्हांत साखरेचा अंश असतो, म्हणून रवा भिजवून मळून ठेविला म्हणजे

तो आंबतो, व मग त्याच्या जिलब्या करितात. घिवर, मांडे वगैरे उंची पक्वान्नेंही रव्याचींच करितात.

गव्हांचें सत्त्व काढितात. गहूं पाण्यांत भिजत घालून, दुसरे दिवशीं पाट्यावर दूध किंवा पाणी घालून ते वाटितात. मग तें मिश्रण फडक्यावर गाळलें, म्हणजे सत्त्व खालीं पडतें. तें लहान मुलांस व अशक्त मनुष्यांस चांगलें मानतें.

कागद चिकटविण्याकरितां गव्हांच्या पिठाची खळ करितात. तसेंच त्याचें पोटीस करून गळवांवर व जखमांवर बांधितात.

---

## ६०. पानांचे आकार.

गुरुजी—मुलांनो, गेल्या खेपेस जेव्हां आपण बागेंत आलों होतों, तेव्हां झाडाचीं इंद्रियें कोणतीं व त्यांचे व्यापार काय असतात, तें पाहिलें. केशव, अनेक व्यापार करणारें झाडाचें इंद्रिय कोणतें तें तुझ्या लक्षांत आहे काय?

केशव—होय, गुरुजी. पानें हें अनेक व्यापार करणारें इंद्रिय आहे.

गुरुजी—चांगलें लक्षांत ठेविलेंस. आज त्याच इंद्रियाविषयीं आणखी कांहीं माहिती करून द्यावी, म्हणून तुम्हांस एथें पुन्हा आणिलें आहे. चला तर, तुम्ही बागेंतील कांहीं झाडांचीं पानें तोडून घेऊन या; मग आपण त्यांविषयीं बोलूं.

मुलांनीं निरनिराळ्या झाडांचीं पानें तोडून आणिल्यावर गुरुजींनीं विचारिलें, "ह्या वडाच्या व पिंपळाच्या पानांचा आकार कसा आहे, सांगा पाहूं?"

अहमद—वडाचें पान मध्यें रुंद आहे, देठाकडे कांहीं कमी रुंद आहे, व शेंड्याला जरा निमुळतें आहे.



नारायण—हें पिंपळाचें पान कांहींसें पत्त्यांतील लाल बदामाच्या आकारासारखें आहे. कारण त्याच्याप्रमाणें ह्याच्या खालच्या अंगास खोंच आहे, पण ह्याचें टोंक मात्र निमुळतें व लांब आहे.

गुरुजी—बरें, त्या गवताच्या पानाचा आकार कसा आहे? गफूर, तूं सांग बरें.

गफूर—तें पान लांबच लांब असून रुंदीला अगदीं कमी आहे. तें बहुतेक तरवारीच्या पातासारखें दिसतें.

गुरुजी—कमळाचें पान कसें असतें हें कोणीं पाहिलें आहे?

माधव—मीं पाहिलें आहे. तें अगदीं वाटोळें असतें.

गोविंदा—केळीचें पान किती तरी मोठें असतें! तें कां बरें इतकें मोठें असतें?

गुरुजी—ज्या झाडांना पाणी फार लागतें, त्यांच्यांत पाणी घेणें व तें पानांवाटे बाहेर टाकणें, हीं कामें फार झपाट्यानें चाललेलीं असतात. इतकें पाणी बाहेर टाकण्याला पानाचा आकारही मोठा असला पाहिजे. ह्याकरितां केळीचीं व अळवाचीं पानें इतकीं मोठीं असतात.

विष्णू—हा मी एक कोरफडीचा तुकडा आणिला आहे. हा किती जाड आहे! गुरुजी, हें देखील पानच का हो?

गुरुजी—होय, तें देखील पानच आहे. कोरफड सुक्या जागींही वाढते. म्हणून तिच्या पानांत पाण्याचा मोठा सांठा राहावा ह्याकरितां तें इतकें जाड असतें.

अहमद—हें आंब्याचें पानही थोडेंसें जाड आहे, पण ह्याच्या कडेला दांते आहेत, व ते अगदीं वाटोळे आहेत.



त्रिविक्रम—पण गुलाबाच्या पानाचे दांते बघा कसे अगदीं करवतीच्या दांत्यांसारखे आहेत !

श्रीधर—पिंपळाच्या व वडाच्या पानांची कड अगदीं सारखी असते, त्यांना दांतेबिते कांहीं नसतात.

गुरुजी—हें एरंडाचें पान पाहा. हें हाताच्या पंजाप्रमाणें फाटलेलें आहे. पोपयाचें पानही असेंच फाटलेलें असून, त्याचा प्रत्येक भाग मुळ्याच्या पानाप्रमाणें आणखी फाटलेला असतो. कांहीं झाडांचीं पानें तर फारच फाटलेलीं असतात. हें पाहा गुलाबाचें पान. तें इतकें फाटलेलें आहे कीं, त्याचे हे निरनिराळे पांच तुकडे झाले आहेत.



केशव—काय ? हे एका पानाचे तुकडे आहेत ! हीं निरनिराळीं पानें नव्हत काय ?

गुरुजी—हो ! हीं निरनिराळीं पानें नव्हत. हे पांचही तुकडे किंवा दळें मिळून एक पान झालें आहे. अशा पानास जोड-पान म्हणतात. चिंचेचीं व हदग्याचीं पानें अशींच असतात. हें बघा, गुलमोहोरचें पान—एवढें मोठें हें सबंध पान आहे ! समोरासमोर गेलेले हे त्याचे तुकडे आहेत,

व त्या तुकड्यांचे पुन्हा लहान लहान तुकडे झाले आहेत! शेवग्याचें पानही असेंच असतें.

**माधव**--पण हे तुकडे किंवा दळें कशावरून? हीं पानें कां नव्हत?

**गुरुजी**--बहुतकरून पान जेव्हां गळून पडतें, तेव्हां तें सगळेंच्या सगळें पडतें. त्याचे तुकडे किंवा दळें निरनिराळीं पडत नाहींत. शिवाय झाडाला फांद्यांचे अंकुर व फुलांच्या कळ्या हीं फुटतात, तीं खोड व पानें ह्यांच्यामधील बेचक्यांतून फुटतात; तशीं तीं ह्या दळांच्या सांध्याजवळ फुटत नाहींत; म्हणून हीं पानें नव्हत. बहुतकरून मोठ्या वृक्षांचीं पानें लहान असतात किंवा त्यांना जोड-पानें असतात. पानांचे जे असे निरनिराळे आकार झाले आहेत, ते त्यांना सूर्यप्रकाश जितका मिळेल तितका घेण्याला सवड मिळावी, म्हणून झाले आहेत.

---

## ६१. कीटक.

**मुंगी**—अरे पतंग दादा, तूं असा इकडून तिकडे उगीच रिकामा कां हिंडतोस?

**पतंग**—मुंग्ये, तूं कोण मला विचारणार? आणि मला तूं 'दादा' कां म्हणतेस? मी तुझा भाऊ आहें कीं काय?

**मुंगी**—अरे, तुम्ही व आम्ही एकाच कुळांतलीं आहों. कीटक हें आपलें दोघांचेंही कूळ; म्हणून मीं तुला दादा म्हटलें. तूं असा रागावतोस कशाला?

**पतंग**—अग! मला पाहा ही कशी छानदार सोंड आहे!

ह्या सोंडेनें मी फुलांतील मध चोखतों. तुला कोठें अशी सोंड आहे? आणि म्हणतेस आपण दोघेंही एकाच कुळांतलीं!



मुंगी—मला सोंड नाहीं, हें खरें. सर्वच कीटकांना सोंड असते असें नाहीं. कीटक कुळाचें मुख्य लक्षण म्हटलें म्हणजे शरिराचे तीन भाग असावयाचे—डोकें, छाती व पोट. ते तिन्ही तुला आहेत आणि मलाही आहेत.

पतंग—पण मला छातीवर हे पाहा सहा पाय आहेत, व डोक्यावर दोन शिंगें आहेत. त्यांनीं मला स्पर्शज्ञान होतें.

मुंगी—अरे, असे पाय आणि शिंगें सर्व किड्यांना असतात. हे पाहा माझे पाय व हीं माझीं शिंगें.

पतंग—पण मला हे सुंदर असे चार पंख आहेत. तुला तसे कोठें आहेत?

मुंगी—तुला चार पंख आहेत, पण सर्वच किड्यांना चार पंख असतात असें नाहीं. कित्येकांना चार व कित्येकांना दोन असतात, व मजसारख्या कित्येकांना मुळींच नसतात. पण आमच्यांत सुद्धां नर व माद्या ह्यांना पंख फुटतात. माझ्या-सारख्या कामकरी मुंग्यांना मात्र पंख फुटत नाहींत. असो, तुम्हां आम्हांला चार स्थितींतून जावें लागतें, म्हणून तुला 'दादा' म्हणण्याचा मला जास्त अधिकार पोहोंचतो. आतां सर्वच किड्यांना चार स्थिति असतात असें नाहीं, हें खरें.

पतंग—आपणांला चार स्थितींतून जावें लागतें म्हणजे काय?

मुंगी—अरे, तुला पूर्वींचें कांहींच आठवत नाहीं ना? आपण पूर्वीं अंड्यांत होतों. अंडीं फुटून बाहेर आलों, तों आपलें शरीर अळीच्या आकाराचें होतें. त्या स्थितींत असतां तूं व तुझ्या भावंडांनीं शेतांतील पिकांची फार नासाडी केली. आम्हांला त्या स्थितींत पायच नसतात, म्हणून आम्हांला वारुळाबाहेर जातां येत नाहीं. त्या वेळीं आम्हांला आमच्या मावशा ज्या मुंग्या, त्या अन्न घालून पोशितात. त्या स्थितीनंतर तुम्ही व आम्ही कोश तयार करून त्यांत किती एक दिवस स्वस्थ पडून होतों. मग कोश फुटून पतंग होऊन तूं बाहेर आलास, व मी मुंगी होऊन बाहेर आलें. तेव्हांपासून तूं कांहीं करीत नाहींस. नुसती मजा मारीत आहेस! ह्या फुलावरून त्या फुलावर व त्या फुलावरून ह्या फुलावर उड्या मारून, त्यांतील मध तेवढा खातोस, इतकेंच!

पतंग—तूं तरी काय करितेस? फुकट साखर खातेस एवढेंच कीं नाहीं?

मुंगी—अरे, आम्ही किती उद्योग करितों तें ऐकून तूंच काय, पण माणसें देखील तोंडांत बोटें घालतील! आम्ही वारूळें बांधितों; तीं मोडलीं तर नीट करितों; व त्यांवर कोणी हल्ला केल्यास त्याशीं लढून त्याला मागें परतवितों. आमच्यांतील नर व माद्या कांहीं काम करीत नाहींत. त्यांच्या अंड्यांची सुद्धां आम्हांलाच काळजी घ्यावी लागते. आम्ही माणसांप्रमाणें जमात करून राहतों व एकमेकांस मदत करितों. रोज आम्ही बारा बारा चौदा चौदा तास सारख्या खपत असतों.

## ६९. घार व गिधाड.

सज्जनगडास जाऊन रामदास स्वामींच्या समाधीचें दर्शन



घ्यावें, असें फार दिवस मनांत होतें; त्याप्रमाणें आज गड चढून जाऊन समाधीचें दर्शन तर घेतलें. मग भूक लागली म्हणून तळ्याच्या कांठीं दशम्यांचें गाठोडें सोडून पाणी आणावयास गेलों, तों तिकडे एका घारीनें माझ्या दशम्या पार लांबविल्या! परवां आमच्या समोरचा तो लखोबा बाजारांतून लोणी आणीत होता, तेव्हांही एका घारीनें झडप घालून त्याच्या पातेल्यांतून बचकभर लोणी असेंच नेलें! किती हा पक्षी धीट! त्याला भय मुळींच नाहीं! असो; एक दोन थालीपिठाचे वडे शिल्लक राहिले होते ते मी खात बसलों, तों आकाशांत अगदीं वर कांहींसें दिसूं लागलें. काय सांगूं! ती पण घारच होती! किती उंचीवर होती ती! इतक्यांत ती झपाट्यानें खालीं

उतरूं लागली. मीं म्हटलें, "बाई, आतां कशाला तूं येत आहेस! तुझ्या बहिणीनें माझ्या सर्व दशम्या नेल्या! तुजकरितां कांहीं शिल्लक ठेविलें नाहीं!" इतकें मी मनांत म्हणतों तों तिनें झपदिशीं खालीं येऊन आपल्या पंज्यांनीं कांहींसें उचलिलें! साप तो! तो तिला इतक्या उंचीवरून दिसला! ती त्यास घेऊन पलीकडच्या एका उंच झाडावर जाऊन बसली. लगेच आपल्या त्या तीक्ष्ण नखांनीं व त्या वांकड्या चोंचीनें त्यास फाडून ती खाऊं लागली! तिचें शेपूट केवढें मोठें होतें! तें दुभागलेलें दिसलें. तिच्या आंगाचा रंग कांहींसा पिंगट होता. सापाचा फडशा पाडून ती आपल्या घरट्यांत गेली. घरटें काटक्यांचें व डाहळ्यांचें केलेलें दिसलें. त्यांत तिचीं अंडीं असावीं, दुसरें काय?

वडे खाऊन मी पाणी प्यालों आणि गड उतरावयास लागलों.



तथें बाजूला एक कडा तुटला आहे. तेथून खालीं दरींत जपून पाहूं लागलों तों तेथें कितो तरी गिधाडें जमलेलीं नजरेस पडलीं. मीं नुकतेंच ऐकिलें होतें कीं, आदल्या दिवशीं एक रेडा त्या कड्यावरून पडून मेला. तव्हां तीं त्याचें मास खावयास जमलीं असावीं असा मीं तर्क केला. जरा खालीं जाऊन पाहतों तों तीं स्पष्ट दिसूं लागलीं.

त्यांची चोंच घारीच्या चोंची इतकी वांकडी नसून जरा टोंकाला मात्र वांकडी होती. घारीप्रमाणें त्यांच्या डोक्यावर व मानेवर केसही नव्हते. त्यांचे डोळे फारच तीव्र दिसत

होते. त्यांचें घ्राणेंद्रियही फार तीक्ष्ण असलें पाहिजे. कोणतेंही जनावर मरून सडूं लागलें म्हणजे हे पक्षी नसतील तेथून येतात असें म्हणतात, तें प्रत्यक्ष अनुभवास आलें! रेडा मेल्याची खबर त्यांस कोणीं दिली होती? छे! ते फार खादाड पक्षी! त्या रेड्याचें मास ते भराभर तोडून गिळीत होते! त्यांचे पंख तरी किती मोठे! शरीर तरी का लहानसान! पण ते आपली उपजीविका नासकें कुसकें मास खाऊन करितात! म्हणून मीं म्हटलें, फुकट जन्म ह्या खादाडांचा! पण फुकट तरी कां म्हणावा? त्यांनीं जर तो मेलेला रेडा खाल्ला नसता, तर तो कुजून जिकडे तिकडे घाण सुटली असती! तेव्हां अशी घाण ते नाहींशी करितात, हा त्यांचा आम्हांवर उपकारच आहे. असा विचार करीत करीत मी खालीं उतरलों.

## ६३. खार आणि ससा.



ससा. खार.

खार पाहिली नाहीं असें कोण आहे? जेथें जेथें झाडें आहेत, तेथें तेथें खारी आहेतच. मुंबईसारख्या मोठ्या शहरीं सुद्धां त्या पुष्कळ आढळतात. रस्त्यावरून उड्या मारतांना व झाडावरून

खालीं व खालून वर पळतांना, त्या तुमच्या दृष्टीस पडतात. त्या इतक्या जलद पळत असतात कीं, त्या क्वचितच हातीं सांपडतात.

आपल्या नेहमीं पाहण्यांत येणाऱ्या खारींचा रंग कांहीं सतेज नसतो; पण त्या फार गोजिरवाण्या व मोहक दिसतात. त्यांकडे पाहात राहण्याची फार मौज असते. त्यांच्या आंगाचा रंग करडा असतो, व पाठीवर काळसर पट्टे असतात. त्यांचें शेपूट करडें व झुपकेदार असतें, आणि त्याची पाठीवर कमान झालेली असते.

कारवाराकडे दुसऱ्या एका जातीच्या खारी आहेत. त्या आपल्याकडील करड्या खारींपेक्षां मोठ्या, म्हणजे मांजरा-एवढ्या, असतात; आणि त्यांचा रंग तांबूस-पिंगट असतो. लोकांना त्या फार सुंदर वाटतात, म्हणून कधीं कधीं ते हौसेनें त्यांना बाळगितात.

खारी धान्यें व कठीण कवटीचीं फळें खातात. तसेंच कोंवळे कोंवळे कोंब व रोपटीं हींही कुरतडून खातात. त्यांचे कांहीं दांत लांब व बळकट असतात, पण ते मांजराच्या सुळ्यांसारखे अणकुचीदार नसतात. मांजर आपल्या तीक्ष्ण सुळ्यांनीं मास फाडितें; पण खार मास मुळीं खातच नाहीं, म्हणून तिच्या दांतांची रचना निराळीच असते, व ते कांहींसे रुंद असतात. तिच्या आंगावरील लव मऊ व दाट असते, आणि तिचे डोळे पाणीदार व चंचळ असतात. तिला ऐकूं फार चांगलें येतें, व जरा खुट्ट झालें कीं ती सटकन उडी मारून पळून जाते. हा प्राणी बळकट नाहीं व दिसावयास उग्रही नाहीं. खारीला आपलें भक्ष्य पकडण्याला तीक्ष्ण नखें अगर दांत असलीं

कोणतींच हत्यारें नसतात. पण जर तुम्ही तिला पकडूं लागलां तर ती चावेल. तीव्र दृष्टि, तीक्ष्ण कर्णेंद्रिय व शीघ्र गति ह्यांच्या योगानें ती शत्रूपासून आपलें रक्षण करिते. आपल्या पिलांना उपद्रव पोहोंचूं नये म्हणून ती आपलें घरटें झाडाच्या ढोलींत अगर फांद्यांच्या दुबेळक्यांत बांधिते.

ससा हा खारीसारखा भित्रा व चपळ प्राणी आहे. ताही मास खात नाहीं; तर रोपटीं, कोंब व धान्य ह्यांवर आपली उपजीविका करितो; म्हणून त्याचेही दांत कुरतुडण्याकरितां रुंद व बळकट असे केलेले असतात. ससा हा खारीसारखा फारसा दृष्टीस पडत नाहीं. तो मुख्यत्वें करून जंगलांत राहतो, व होतां होईल तों माणसाच्या दृष्टीस पडत नाहीं. खारीप्रमाणेंच त्याला ऐकूं चांगलें येतें. त्याचे कान मोठे असतात, त्यांच्यायोगानें बारीक व दूरचा देखील आवाज त्यास ऐकूं येतो. त्याचें शेपूट मात्र फार लहान असतें. त्याचे मागचे पाय मोठे व बळकट असतात; त्यामुळें त्यास मोठमोठ्या उड्या भराभर घेतां येतात, आणि मोठ्या वेगानें पळत जाऊन, शत्रूपासून आपला बचाव करतां येतो. त्याच्या आंगावरची लव दाट व मऊ असते; आणि तिचा रंग करडा-पिंगट असा असतो. सशाला कल्लेही असतात, त्यांनीं अंधेरांत तो आपला मार्ग शोधून काढितो. बहुतकरून तो रानांतील उंच गवताच्या थोंबांत राहतो, आणि संध्याकाळीं जित्राप खाण्यासाठीं शेतांत जातो. ससे जित्राप खाऊन शेताची केव्हां केव्हां फार नासाडी करितात, म्हणून शेतांमध्यें शेतकरी

त्यांना पकडण्याकरितां सांपळे लावून ठेवितात, किंवा त्यांना गोळी घालून मारितात.

खार, ससा, उंदीर व घूस हे सर्व प्राणी 'कुरतुडणारे प्राणी' म्हणून प्राण्यांचा जो एक वर्ग आहे, त्यांत मोडतात.

---

## ६४. कुत्रा.

रामा आणि लखू मोत्याला घेऊन फिरावयास गेले होते. वाटेंत त्यांचा बाप त्यांस भेटला. आपल्या धन्यास पाहिल्याबरोबर मोत्याला आनंद झाला, व तो आपली शेपटी हालवीत, उड्या मारीत, त्याजकडे धावत गेला.

**रामा**—बाबा, आज आम्हीं पळण्याची शर्यत लाविली होती, तींत मोत्या आमच्यापुढें गेला!

बाप—मुलांनो, त्याची ती रुंद छाती व ते लांब पाय पाहा. त्यांच्यायोगें त्याला इतकें जलद पळतां येतें.

लखू—आज सकाळीं नदींत मोत्या कसा झपझप पोहत होता! ह्याच्या सारखें पोहण्यास मला येईल तर किती मजा होईल!

बाप—नित्य सराव ठेविला, तर येईल तसें पोहतां. पण मुलांनो, मांजर पाण्यांत जातांना तुम्हीं कधीं पाहिलें आहे? त्याच्या आंगाला पाणी लागलें तर तें लवकर निचरून जात नाहीं, त्यामुळें त्याला फार त्रास होतो. पण कुत्र्यानें, पोहून आल्यावर, एकदा आंग झाडिलें, म्हणजे झाला तो मोकळा!

मुलांनो, या, आपण ह्या दगडावर जरा बसूं. आतां मी तुम्हांला कुत्र्याचें तोंड, पाय, वगैरे कसे असतात, तें दाखवितों. मोत्या, ये; तुझें तोंड उघड पाहूं.

रामा—लखू, पाहा ह्याचे दांत कसे बळकट व तीक्ष्ण



दिसत आहेत. हे बघ चार सुळे किती लांब व बळकट आहेत ते!

बाप—हे त्याला मास फाडण्याला व त्याचे तुकडे करण्याला फार उपयोगीं पडतात. आपल्यासारखें त्याला दांतांनीं चघळायाला येत नाहीं. ह्याचा जबडा वर खालीं मात्र होतो; पण त्याला तो आपल्यासारखा बाजूला हालवितां येत नाहीं.

लखू—बाबा, ह्याची जीभ अगदीं मऊ, गुळगुळीत व ओली अशी आहे.

बाप—कुत्र्याच्या जिभेचा तुम्हांला एक चमत्कार सांगतों. आपल्यासारखा कुत्र्याच्या आंगाला घाम येत नाहीं; पण त्याच्या जिभेला घाम सुटतो. हा मोत्या उन्हांतून जाऊन आला अगर पळून दमला, म्हणजे त्याची जीभ बाहेर लोंबत असते, व तींतून



घाम गळत असतो. मोत्या, तुझा पाय उचल पाहूं. मुलांनो, आतां सांगा ह्याला नखें किती आहेत तीं.

रामा—एक, दोन, तीन, चार, पांच; बाबा, ह्याच्या पुढल्या पायाला पांच नखें आहेत.

बाप—मोत्या, आतां मागला पाय उचल पाहूं.

लखू—अरे! मागल्या पायाला चारच!

रामा—ह्याचे हे तळवे किती मऊ आहेत हो! पळत असतांना त्यांचा आवाज होत नसेल?

लखू—भाऊ, आपण हा चेंडू फेकूं, म्हणजे मोत्या तो

आणण्याकरितां धावेल. मग त्याचे पाय वाजतात कीं नाहीं, तें आपण पाहूं.

रामा—हा पाहा पळाला ! चेंडू पकडला ! पण काय हो बाबा, ह्याचे पाय वाजतात ! मांजराचे पाय वाजतांना आपण नाहीं कधीं ऐकिलें.

बाप—मांजराला आपलीं नखें आंत ओढून घेतां येतात, तशीं कुत्र्याला घेतां येत नाहींत; म्हणून पळतांना तीं जमिनीवर आपटून आवाज होतो. कुत्र्यासारखा हुशार, समजदार, इमानी व मायाळू असा दुसरा प्राणी नाहीं. मुलांनो, कुत्रा हा मनुष्याचा हुकमी चाकर व जिवलग मित्र आहे, म्हणून लोक इतक्या आवडीनें कुत्रे बाळगितात. कुत्र्याची आपल्या धन्यावर फार भक्ति असते, तशी मांजराची नसते. तुम्ही दुसरीकडे कोठें राहावयास गेलां, व बरोबर पाळलेलें मांजर नेलें, तरी तें परत पहिल्या ठिकाणीं जाऊन राहील; म्हणजे त्याचा ओढा जागेकडे असतो, माणसाकडे नसतो. कुत्र्याचें तसें नाहीं; आपला धनी जिकडे जाईल, तिकडे तो जावयाचा.

पण, मुलांनो, चला आतां घरीं जाऊं; आणि जेवल्यावर आपण कुत्र्याच्या जातीचींच कांहीं श्वापदें आहेत त्यांबद्दल बोलूं.

---

## ६९. कुत्र्याच्या वर्गांतील प्राणी.

घरीं जाऊन जेवण झाल्यावर बापानें विचारिलें, "मुलांनो, कुत्र्यासारखे कांहीं प्राणी तुम्हीं पाहिले आहेत काय ?"

रामा—नाहीं, बाबा, आम्हीं नाहीं पाहिले. असे कोणते प्राणी ते ?

बाप—लांडगा, कोल्हा व खोकड हे कुत्र्याच्या वर्गांतले प्राणी





लांडगा. कोल्हा.

आहेत. हीं रानटी जनावरें माणसाळत नाहींत, म्हणून तीं पाहण्यास फारशीं मिळत नाहींत. पण आजच एथें एक दरवेशी तीं जनावरें पिंजऱ्यांत घालून घेऊन आला आहे. तो तीं बडोद्यास नेत आहे.

मुलगे—बाबा, चला तर, तीं आम्हांस दाखवा.

मग ते तिघेजण गांवाबाहेर आंबराईंत दरवेशी उतरला होता, तेथें गेले. पिंजऱ्याजवळ गेल्यावर रामा म्हणाला, "बाबा, ह्या जनावराचे कान बघा कसे उभे असून शेवटीं बारीक आहेत. डोळे लांबट आहेत. शेपूट पाहा कसें सरळ आहे, कुत्र्याच्या-सारखें वांकडें नाहीं. पण इतर गोष्टींनीं हें जनावर हुबेहूब कुत्र्यासारखें दिसतें. हा लांडगा काय हो ?"

बाप—होय, लांडगाच हा. त्याच्या मानेवरले केस बघा कसे रांठ आहेत; त्यामुळें त्याची मान कुत्र्याच्या मानेपेक्षां जाड दिसते.

लखू—अरे, तो पाहा त्यानें आपला जबडा उघडिला ! त्याचे दांत अगदीं कुत्र्याच्यासारखे दिसतात.

रामा—त्याची मुद्रा कशी क्रूर दिसते ही ! बाबा, लांडगा कुत्र्यापेक्षां बळकट असेल, नाहीं बरें ?

बाप—होय. लांडगे बळकट व क्रूर असतात, पण भित्रेही

असतात. ते कळप करून राहतात, व टोळ्याटोळ्यांनीं आपलें भक्ष्य शोधण्याकरितां जातात. तो पलीकडचा कोल्हा पाहा !

रामा—कोल्हा लांडग्यापेक्षां लहान आहे, आणि त्याचा रंग निराळा आहे. लांडग्याचा रंग करडा आहे, पण ह्याचा तांबूस पिंगट आहे. ह्याचें तोंड फार चिंचोळें आहे, आणि मुद्रा कशी कावरीबावरी दिसते.

लखू—ह्याचे डोळे लहान व वाटोळे आहेत. बाबा, कोल्हेही कळप करून राहतात काय ?

बाप—होय. तसेच ते टोळ्याटोळ्यांनीं आपलें भक्ष्य शोधितात. वाघ व सिंह ह्यांच्या मागूनही कधीं कधीं जाऊन, त्यांनीं मारून अर्धवट खाऊन टाकलेलीं सावजें ते खातात. कोल्हे कांहींसा रडल्यासारखा शब्द करतात; त्याला ‘ कोल्हेकुई ’ म्हणतात. कोल्हा फार धूर्त व लुच्चा असतो.

रामा—तो त्याच्या पलीकडला खोकड वाटतें ? त्याचें तोंड कोल्ह्यासारखेंच अगदीं चिंचोळें आहे; पण त्याचे कान लांडग्याच्या कानांसारखे दिसतात.

लखू—त्याचें डोकें जरा वाटोळें आहे; आणि पाय लहान आहेत. पण शेपटी किती झुबकेदार आहे ही !

बाप—त्याचे डोळे तुम्हीं पाहिलेत काय ?

रामा—बाबा, त्याचे डोळे मांजराच्या डोळ्यांसारखे दिसतात. ती बघा त्याच्या डोळ्यांतली चीर.

बाप—होय, पाहिली. खोकडही कोल्ह्यासारखाच कावबाज प्राणी आहे. पण तो कळप करून राहात नाहीं. तो रात्रीं हिंडून आपलें भक्ष्य पकडतो. त्याचें भक्ष्य म्हटलें म्हणजे कोंबडीं, ससे, घुशी, हे प्राणी होत. असें म्हणतात कीं, खोकडांना फळफळावळ, व त्यांतही द्राक्षें, फार आवडतात. ते

उसाची फार नासाडी करितात. खोकडांच्या व कोल्ह्यांच्या कावेबाजपणाविषयीं पुष्कळ गोष्टी ऐकण्यांत आहेत.

---

## ६६. मांजर.

दामू आणि माधव मांजराच्या पिलांबरोबर खेळत होते. त्यांतलें एक पिलूं, चुलीजवळ मांजरी उबेंत पडली होती, तिकडे धावूं लागलें, म्हणून दामूनें त्याची शेपटी ओढिली. त्यामुळें तें धडपडूं लागलें, त्याबरोबर भाटी त्या पिलाजवळ जाऊन, त्याला जरा चाटून, मुलांकडे रागानें पाहून बोलूं लागली.

"मुलांनो, मी तुमच्या उपयोगीं इतकी पडत असतां, तुम्ही आपल्या करमणुकीकरतां माझ्या पिलांचे हाल करतां, हें बरें नव्हे. रात्रीं पोत्यांना व कणग्यांना भोकें पाडून उंदीर धान्याचा फार नास करितात. त्यांनीं खडबड केलेली ऐकूं आली, तरी ते तुम्हांस अंधेरांत दिसावयाचे नाहींत; बरें दिवा लाविला कीं ते बिळांत पळतात. मला दिव्याबिव्याची कांहीं जरूर नाहीं. हे पाहा माझे डोळे. ह्यांतली बाहुली आतां कशी बारीक रेघेसारखी दिसते आहे! पण जरा अंधेर करा, कीं तीच पाहा कशी मोठी होते ती! प्रकाश कमजास्त पाहिजे असेल, त्या मानानें तुम्हीं जशी खोलीची खिडकी झाकितां किंवा उघडितां, त्याप्रमाणें ही बाहुली मी लागेल तशी कमी किंवा जास्ती उघडितें. त्यामुळें रात्रीं जरी थोडा प्रकाश असला, तरी मला उंदीर दिसतात, व म्हणून मला ते सहज पकडतां येतात. हे पाहा माझ्या वरच्या ओठाला दोहोंकडे लांब लांब केस आहेत. ह्यांना मिशा म्हणतात."

माधव—तूं बायको असून तुला मिशा आहेत! आमच्यामध्यें नाहीं बुवा बायकांना मिशा येत!

मांजरी—अरे, आमच्यांत मिशा हें एक इंद्रिय आहे. त्यांचा नराला व मादीला उपयोग सारखाच होतो. तुमच्यासारख्या

त्या नुसत्या शोभेसाठीं नाहींत ! तुमच्या मिशांना हात लाविला तर तुम्हांस कळत नाहीं, पण माझ्या ह्या मिशांस स्पर्श केला कीं लगेच मला कळतें. आंधळ्याला जशी मार्ग काढण्यास काठी, तशा ह्या मिशा मला अगदीं गडद् काळोखांत उपयोगीं पडतात.



मुलांनो, हे पाहा माझे पाय. मी चालूं लागलें अगर धावूं लागलें, तरी माझ्या पायांचा अगदीं आवाज होत नाहीं; व माझ्या येण्याजाण्याची चाहूल उंदरांना अगदीं लागत नाहीं. ती लागावी म्हणून त्यांनीं एकदां माझ्या गळ्यांत घांट बांधण्याचा विचार चालविला होता ! पण तें काम त्यांच्यापैकीं कोण करणार ?

बरें, हीं पाहा माझीं नखें. तुम्ही जशी तरवार म्यानांतून



बाहेर काढितां, तशीं मीही आपलीं नखें पंजांतून बाहेर काढितें. हीं पुढल्या पायाला पांच व मागच्या पायाला चार अशीं आहेत. ह्या नखांनीं व ह्या माझ्या जबड्यांतील दांतांनीं मी उंदीर व पक्षी पकडतें व फाडतें. ही बघा माझी जीभ.

दामू—अरे, हिची जीभ किती तरी खरखरीत दिसते ही ! कुत्र्याची अशी नसते.



मांजरी—होय. माझ्या जिभेवर कांटे असतात; त्यांनीं मला हाडावरील मांस अगदीं निपटून खातां येतें. मी फार थोर कुळांतली आहें. वाघ व सिंह हे माझ्या कुळांतलेच ! मुलांनो, माझा उपयोग व माझें कूळ लक्षांत आणून, मला व माझ्या पिलांना त्रास देत जाऊं नका. आम्हांस दूध फार आवडतें, म्हणून तें रोज थोडथोडें तरी देत जा.

## ६७. मांजराच्या वर्गांतील प्राणी.





एके दिवशीं नारायणराव आपल्या मुलांस म्हणाले, "मुलांनो मांजराच्या वर्गांतील मोठमोठे रानटी पशु पाहण्याकरितां राणीच्या बागेंत येतां काय ?" हें ऐकल्याबरोबर मुलांस आनंद होऊन, ते लागलेच पोशाक करून बापाबरोबर निघाले.

बागेंत गेल्यावर नारायणरावांनीं मुलांना अगोदर सिंहांच्या पिंजऱ्याकडे नेलें व म्हटलें, "हा बघा सिंह आणि ती सिंहीण !" त्या भयंकर पशूंकडे पाहिल्याबरोबर मुलांना चमत्कार वाटला व भयही वाटलें. दामूचें लक्ष प्रथम त्यांच्या डोळ्यांकडे गेलें, व तो म्हणाला, "नाना, मांजरांच्या डोळ्यांमध्यें जशी बाहुलीची चीर आम्हीं पाहिली, तशीच ह्या सिंहाच्याही डोळ्यांत आहे."

**नारायणराव**—होय, पण तूं रात्रीं येऊन जर पाहशील, तर

तुला हीच चीर फाकलेली व विस्तवाच्या गोळ्याप्रमाणें धगधगीत अशी दिसेल.

**माधव**—केवढें थोरलें हें सिंहाचें डोकें! त्याच्या मानेवरचे ते केस बघा! ते किती लांब, काळे व शोभिवंत दिसतात! नाना, त्यांना आयाळ म्हणतात, नाहीं?

इतक्यांत एक मनुष्य जनावरांना देण्याकरितां हातगाडीमध्यें मास घेऊन आला. त्याला पाहिल्याबरोबर सिंह आपली शेपटी हालवूं लागला, व गुरगुरावयास लागला. लागलीच त्यानें मेघासारखी गर्जना केली. त्याबरोबर मुलगे फारच भ्याले, व त्यांनीं बापाला घट्ट धरिलें. लहानशा कुटुंबाला आठवडा-भर पुरेल, इतकें मास सिंह व सिंहीण ह्यांच्यापुढें टाकून, तो मनुष्य निघून गेला, व तीं दोघें आपल्या भयंकर पंजांनीं तें फाडून खाऊं लागलीं. तेव्हां त्यांचे जबडे व पंजे मांजराच्या सारखेच, पण फार अकराळविकराळ आहेत, असें मुलांस दिसून आलें.

मग नारायणराव मुलांना वाघाच्या पिंजऱ्याकडे घेऊन गेले व म्हणाले, "मुलांनो, हा वाघ पाहा. हा किती क्रूर दिसतो!"

**दामू**—ह्याचेही डोळे मांजर व सिंह यांच्यासारखेच दिसतात.

**माधव**—त्यानें आपला जबडा उघाडिला, बघा! मांजरा-प्रमाणेंच ह्याला चार सुळे आहेत. आणखी ते पाहा त्याचे पंजे! ह्याच्याही पंजाला तीक्ष्ण नखें असतात काय?

**नारायणराव**—होय. ती पाहा वाघीण आपल्या नखांनीं मास कशी फाडीत आहे!

**माधव**—ह्यांच्या आंगावर कसे पट्टे पट्टे आहेत! ह्यांचें आंग तरी किती गुळगुळीत दिसतें!

**दामू**—वाघाचें शरीर सिंहाच्यापेक्षां लांबीला जास्त आहे, पण सिंह अधिक उंच दिसतो.

**नारायणराव**—होय. हे पशु रानांत जेव्हां मोकळे असतात, तेव्हां इतर जनावरांना व माणसांना ह्यांचा मोठा दरारा असतो. सिंहाला भूक लागली म्हणजे तो आपलें भक्ष्य पकडून मारून खातो; पण वाघाला रक्ताची आवड फार, म्हणून त्याला भूक असो अगर नसो, तो जनावरांना त्यांच्या रक्ताखातरच मारितो. सिंह हिंदुस्तानांत अलीकडे फारसा आढळत नाहीं; पण वाघ सह्याद्रीच्या जंगलांत व मध्य हिंदुस्तानांतील अरण्यांत अजून पुष्कळ सांपडतात.

आतां घरीं जाण्याची वेळ झाली होती; पण मुलांना वाघाच्या पिंजऱ्यापलीकडे आणखी एक पिंजरा दिसला, म्हणून त्याकडे ते धावले. त्यांत वाघापेक्षां जरा लहान, पण अगदीं मांजरासारखें गोजिरवाणें व खूप बळकट व चपळ, असें जनावर होतें. त्याच्याभोंवतीं पिलें मांजराच्या पिलांप्रमाणें खेळत होतीं. त्यांचा रंग मळकट पिवळा होता व त्यांच्या सर्व आंग-भर काळे ठिपके होते. नारायणराव म्हणाले, "मुलांनो, हे चित्ते बरें! हे जंगलांत पुष्कळ असतात व गुरांस व कधीं कधीं माणसांसही फार इजा करितात." मुलगे चित्त्यांची मौज पाहात कांहीं वेळ उभे राहिले, व मग बापाबरोबर घरीं गेले.

---

## ६८. अस्थि व स्नायु.

शंकर—काय हो मामा, गोगलगाय, कोळी, पतंग व सुरवंट ह्यांचें आंग हाताला किती मऊ लागतें! तसें कुत्र्याचें, बैलाचें किंवा आपलें आंग कां बरें मऊ नसतें?



मामा—अरे, कुत्रा, बैल, इत्यादि प्राण्यांच्या शरिरांत अस्थि म्हणजे हाडें असतात; तशीं गोगलगाय, कोळी, इत्यादिकांच्या शरिरांत नसतात. आपल्या शरिरांत दोनशांवर हाडें आहेत.

शंकर—काय म्हणतां! दोनशांवर हाडें आपल्या आंगांत! पण तीं मोजावयास हो कशीं सांपडलीं? मला तर माझ्या आंगांतील पांच पंचवीस देखील मोजतां येतील कीं नाहीं, कोण जाणे!

मामा—शंकर, जिवंत प्राण्यांचीं नाहीं मोजितां यावयाचीं. पण माणूस किंवा जनावर मेल्यावर त्याचें मास काढून हाडें मोजितां येतात. आमच्या इस्पितळांत हाडांचा सांपळा ठेविलेला नाहीं का तूं पाहिलास?

शंकर—होय. पाहिला आहे खरा. त्यांत तें डोकें; हात, पाय, मान ह्यांचीं हाडें; पाठीचा कणा; बरगड्या; बोटांचीं

पेरें; मणगटांतलीं हाडें; किती तरी हाडें! पण तें सगळें विद्रूपच दिसतें!

मामा—मासानें शरिराला गोंडसपणा येतो. तें मासच जर नाहीं, तर नुसतीं हाडें विद्रूप दिसावयाचींच!

शंकर—हाडांनीं शरिराला बळकटपणा येत असेल. पण त्यांचा दुसरा कांहीं उपयोग आहे काय?

मामा—हाडांचा सांपळा हें एक कपाट आहे. कपाटांत जसे उंची पदार्थ सुरक्षित राहावे म्हणून ठेवितात, त्याप्रमाणें आपल्या शरिरांतील अत्यंत महत्त्वाचीं इंद्रियें ह्या सांपळ्यांत ठेवलेलीं आहेत. डोक्याच्या कवटीच्या खालीं मेंदू, डोळे व कान, तसेंच बरगड्यांच्या आंत फुप्फुसें व हृदय, अशीं हीं सर्व इंद्रियें कपाटांत जतन करून ठेवावीं, तशीं ठेविलीं आहेत.

शंकर—बरें, आपण मान इकडे तिकडे फिरवितों, कंबर वांकवितों, पायांनीं पळतों, हात वर खालीं करितों, तेव्हां आपलीं हाडेंच हालतात ना? पण हीं हाडें हालतात कशीं?



मामा—आपल्या हाडांवर मास असतें, त्यांत एका प्रकारच्या तंतूंचीं जुडगीं असतात. त्यांस 'स्नायु' म्हणतात. स्नायु हे रबरासारखे असतात. रबर जसा ताणून लांब होतो व सोडिला म्हणजे आंखूड होतो, तसे हे स्नायु ताणिले म्हणजे लांब होतात; नाहीं तर ते आकुंचन पावलेले व फुगलेले असतात.

शंकर—तर मग ह्या माझ्या दंडांत हा स्नायुच असेल. हात वर उचलिला म्हणजे दंडांतील मास बेटकुळीसारखें फुगतें, व हात लांब केला म्हणजे त्याचा फुगीरपणा मोडतो. पण हात खालीं असतो, तो वर केल्यानें वरच्या दंडांतील मास कां फुगावें ?

मामा—स्नायु तंतुतंतूंनीं झालेला असतो. त्याच्या दोन टोकांना दोन धागे असतात. एका धाग्यानें दंडांतील स्नायु दंडांतील हाडाला बांधिलेला आहे, व त्याचा दुसरा धागा पुढल्या हातांतील हाडाला बांधिलेला आहे. दंडांतील स्नायु जेव्हां आकुंचन पावावयास लागतो, तेव्हां खालच्या धाग्याला ताण बसतो, म्हणून हात वर उचलतो. तोच स्नायु लांब झाला म्हणजे हा धागा ढिला पडतो, म्हणून पुढला हात सरळ होतो. ह्या-प्रमाणेंच सर्व स्नायूंची स्थिति आहे.

---

## ६९. त्वचा.

आपल्या शरिरावर काय पांघरूण असतें बरें ? धोतर, बंडी, तुमान, हीं पांघरुणें आहेत खरीं; पण हीं पांघरुणें स्वाभाविक नाहींत. आंगावरील कातडी हें आपलें स्वाभाविक पांघरूण होय. धोतरें, उपरणीं, आंगरखे, बंड्या, तुमानी, रुमाल, हीं पांघरुणें सर्वांजवळ असतीलच असें नाहीं; पण शरिराचें स्वाभाविक पांघरूण जी आंगावरील कातडी, ती सर्वांस असावयाचीच.

कातडीनें स्नायु, हाडें व आंतील इंद्रियें ह्यांचें चांगलें संरक्षण

होतें, व शरिरास जो नितळपणा आला आहे तो तिच्यामुळेंच. कातडीस त्वचा असेंही म्हणतात.




१. त्वचेंतील छिद्रें.

त्वचेचे दोन भाग असतात. एक बाहेरील म्हणजे बाह्य त्वचा; व दुसरा आंतील म्हणजे आंतर त्वचा.

आपलें आंग भाजलें, अगर त्यास कोणत्याही कारणानें फोड आला, म्हणजे बाहेरील त्वचा वर उचलते. तींत रक्त नसतें. तीं फाडिली किंवा कापिली तर कांहीं समजत नाहीं. शेवटीं तिचे तुकडे तुकडे होऊन ते पडून जातात, आणि नवी त्वचा तिच्या जागीं येऊन जखम बरी होते.

शरिराच्या ज्या भागाला काम जास्त पडतें, त्या भागाची बाह्य त्वचा जाड आणि कठीण होते. म्हणूनच मजूर लोकांच्या व तालीमबाजांच्या हातांस घट्टे पडलेले असतात.

आंतर त्वचा फार नाजूक असते. तिला जर टोंचलें तर अगदीं सहन होत नाहीं. आपलें आंग खरचटलें अगर दुसऱ्या कशानें त्यावरील बाह्य त्वचा निघून गेली तर आंतली त्वचा उघडी पडते. तिला अगदीं हात लाववत नाहीं. ह्या आंतर त्वचेंत रक्त पुष्कळ असतें. तक्या, गाद्या, ह्यांतील कापूस इकडे तिकडे पडूं नये, म्हणून तो खारव्याच्या खोळींत घालावा लागतो; व ती खारव्याची खोळ मळूं नये, म्हणून आपण तिच्यावर अभ्रा

घालितों; त्याप्रमाणेंच शरिराच्या आंतील भागांचें रक्षण व्हावें म्हणून त्यांजवर आंतली त्वचा पसरलेली असते; व ती नाजूक असल्यामुळें तिला थोडासुद्धां ढका सहन होत नाहीं, म्हणून तिचें रक्षण करण्याकरितां अभ्र्याप्रमाणें बाहेरील त्वचेची योजना केली आहे.

शरिराला शोभा आणणें व आंतील इंद्रियांचें रक्षण करणें, हीं त्वचेचीं कामें आहेत खरीं; पण तिचें मुख्य काम म्हटलें म्हणजे आपल्या शरिरांतील घाण बाहेर काढून टाकणें हें होय. आपल्या त्वचेला असंख्यात छिद्रें आहेत. त्यांच्यावाटे घामाबरोबर ही घाण बाहेर पडते.



१. केस. २. बाह्य त्वचा व आंतर त्वचा.

आंगावरील केस त्वचेंतूनच निघतात. त्यांतून एक प्रकारचें तेल बाहेर येत असतें, त्यानें कातडी मऊ राहते. केसांनीं आंगाला ऊबही राहते.

कित्येक प्राण्यांच्या आंगावर केस पुष्कळच असतात मेंढ्याच्या आंगावर लोंकर किती दाट असते! पण त्याची कातडी पातळ असते. हत्तीच्या व रेड्याच्या कातडीवर केस नसतात, पण त्यांची कातडीच इतकी जाड असते कीं, तिच्या योगानें थंडीपासून त्यांचा बचाव होतो.

## ७०. कमावलेलें कातडें.

हरीनें पुष्कळ दिवस बुटांचा नाद घेतला होता. त्याचा चुलता नारायणराव कांहीं कामाकरितां मुंबईस जात होता, तेव्हां हरीनें त्यास बूट आणावयास सांगितलें, व "विसरूं नका हो!" म्हणून तीनतीनदां बजाविलें. नारायणराव मुंबईहून आल्याबरोबर हरीनें "बूट आणिले का?" म्हणून मोठ्या उतावळीनें विचारिलें. चुलत्यानें बूट आणिलेच होते, ते त्यास दिले. बूट पाहतांच हरीस जो आनंद झाला तो काय सांगावा?

ते बूट घेऊन, त्यानें बुटाचा तळ किती बळकट आहे, वरला भाग कसा गुळगुळीत व चकचकीत आहे, व आंतलें अंग किती मऊ आहे, तें पाहिलें.

हें सर्व नारायणराव लक्ष लावून पाहात होता. इच्छिलेली वस्तु मिळाली म्हणजे मुलांना कसा आनंद होतो, तें पाहून त्याला मोठें कौतुक वाटलें, व तो म्हणाला, "हरी, बूट कशाचे करितात हें तुला ठाऊक आहे काय?"

हरी—होय; बूट कातड्याचे करितात, व तें कातडें कमावलेलें असतें. पण काका, कमावलेल्या कातड्याचेच ते कां करितात?

काका—कच्चें कातडें नरम व ओलें असतें. तें वाळविलें नाहीं तर कुजूं लागतें. बरें, तसेंच वाळविलें, तर तें कडकडीत होतें, व त्याला सुरकुत्या पडतात, आणि घडी घातली कीं तें मोडतें. पण जर कातडें कमावलें, तर लवचीक व नरम होतें. आणि मोडत नाहीं. कमावल्यानें तें हलकें होतें व पुष्कळ दिवस टिकतें. कमावलेल्या कातड्यांत पाणी शिरत नाहीं,

म्हणून पावसांतून बूट घालून बाहेर गेलें, तरी पाय भिजत नाहींत व पायांना ऊब राहते. हरी, कातडें कसें कमावतात हें तुला ठाऊक आहे काय ?

हरी—होय; परवां एकदां मी ढोरवाड्यावरून चाललों होतों, तेथें कातड्याच्या पिशव्या शिवून टांगून ठेविल्या होत्या. काका, तेथें घाण किती येत होती म्हणून सांगूं ! माझ्यानें तेथें उभें राहवेना ! "तुम्ही कातडें कसें कमावतां?" असें ढोरांस मीं विचारिलें. तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, "जनावरांच्या आंगावरलें कातडें काढिल्यावर, तें आम्ही चुन्याच्या पाण्यांत बारा पंधरा दिवस भिजत ठेवितों, म्हणजे त्याच्यावरचे बहुतेक केस खडतात. मग तें धुऊन, राहिलेले केस वगैरे रापीनें काढून, साफ करितों. नंतर एका कुंडींत बाभळीची साल, हिरड्यांची भुकटी व पाणी भरून, त्यांत चामडें भिजत ठेवितां. दहा पंधरा दिवसांनी तें कातडें काढून, त्याची अशी पिशवी भरून, तींत पुन्हा बाभळीची साल, हिरड्याची भुकटी व पाणी भरून, सात आठ दिवस ती टांगून ठेवितों. नंतर तें कातडें धुऊन, तेल लावून वाळवितों व रापीनें साफ करून विकतों."

काका—हरी, कमावलेल्या कातड्याच्या कोण कोणत्या जिनसा तूं पाहिल्या आहेस ?

हरी—आपल्या घोड्यावरचें जीन, माझ्या पुस्तकावरचा पुठ्ठा, आणि माझे हे बूट, ह्या जिनसा कमावलेल्या कातड्याच्या आहेत. आमच्या शाळेंत एक पारशाची मुलगी आहे, ती, थंडी फार पडली म्हणजे, हातमोजे घालते; तेही कातड्याचेच आहेत.

काका--पण ह्या सर्वांचें कातडें एकाच जातीचें आहे असें तुला वाटतें काय?

हरी--हातमोजांचें कातडें किती तरी मऊ व जिनाचें किती तरी कठीण असतें! तेव्हां तीं एकाच जातीचीं कशीं असतील? पण तीं निरनिराळ्या प्रकारचीं कशीं होतात?

काका--तीं निरनिराळ्या जनावरांचीं कातडीं असतात, व तीं निरनिराळ्या कामास येतात. डुकराच्या कातड्याचें जीन करितात; शेळीच्या कातड्याचे पुस्तकांचे पुठ्ठे करितात; हातमोजे करडाच्या कातड्याचे, बूट व जोडे बैलाच्या कातड्याचे, व मोटा आणि पखाली म्हशीच्या कातड्याच्या करितात.

---

## ७१. लोंकर.

मास्तर--तुम्हीं पुष्कळांनीं मेंढ्या पाहिल्या असतील असें मला वाटतें. पण ज्यांनीं मेंढ्या पाहिल्या नसतील, त्यांना बकरीं तरी माहीत असतील. बरें, महंमद, मेंढीच्या आंगावर डगलें कसलें असतें, हें तुला सांगतां येईल?

महंमद--मास्तर, मेंढरावर डगलें घातलेलें मीं कधीं पाहिलें नाहीं! कधीं कधीं थंडीच्या दिवसांत बैलावर झूल घालितात, पण मेंढरावर कांहीं घालीत नाहींत.

मास्तर--बरें, पण मीं मेंढरें व बकरीं ह्यांच्या आंगावर डगलीं पाहिलीं आहेत. कासम, मी कोणत्या प्रकारचें डगलें म्हणतों, तें तुला सांगतां येईल काय?

कासम--होय, मास्तर. मेंढरें व बकरीं ह्यांच्या आंगावरील

लोंकर व केस हेंच त्यांचें डगलें, असा तुमच्या म्हणण्याचा अर्थ असावा असें मला वाटतें. डगल्यापासून जशी आपल्या आंगांत ऊब राहते, तशी त्यांच्या आंगांत लोंकरीनें व केसांनीं राहते.

**मास्तर**—बरोबर. महंमद, ह्या बाबतींत आपणांत व मेंढरांत फरक कोणता, तें सांग बरें?

**महंमद्**—मेंढरांप्रमाणें आपल्या आंगावर लोंकर नसते. आपण जीं डगलीं घालितों तीं आपण स्वतां करून घालितों.

**मास्तर**—खरें; पण आपलीं डगलीं कशाचीं केलेलीं असतात, तें तुम्हांला ठाऊक आहे काय?

**कासम**—होय, मास्तर. तीं कापसाचीं केलेलीं असतात.

**मास्तर**—बरें, आणखी कशाचीं करितात काय? थंडीच्या दिवसांत आपण कापसाचेंच कपडे घालितों काय?

**महंमद्**—कांहीं कपडे जाड आणि ऊबदार असतात, पण ते कशाचे करितात हें मात्र मला माहीत नाहीं.

**मास्तर**—बरें, मी सांगतों. ते लोंकरीचे करितात. लोंकर मेंढरें व दुसरे प्राणी ह्यांच्या आंगावर असते. ह्यावरून तुमच्या लक्षांत आलें असेल कीं, मेंढरांच्या आंगावरील डगल्याचेंच आपण आपलें डगलें करितों. मेंढरांना कांहीं आपलीं डगलीं तयार करण्याचे श्रम पडत नाहींत, पण आपणांला आपले कपडे तयार करावे लागतात, व ते करण्याला फार श्रम व काळजी घ्यावी लागते. पहिल्यानें, मेंढरांना न दुखावतां, तीक्ष्ण धारेच्या कातरीनें त्यांच्या आंगावरील लोंकर कातरतात. नंतर ती सर्व गोळा करून स्वच्छ करतात. स्वच्छ झाल्यावर

आणखी ती कमावून, तिचें सूत काढून, कापड विणतात. मग त्याचे आपण कपडे करितों. बरें, महंमद, लोंकरीसारखें आपल्या आंगावर कांहीं वाढतें काय?

**महंमद**—नाहीं, मास्तर. आपल्या आंगावर केस असतात, पण ते कांहीं लोंकरीसारखे दाट व कुरळे नसतात.

**मास्तर**—[illegible] खरें; पण महंमद, लोंकर म्हणजे तरी काय, मेंढरांच्या आंगावरील केसच आहेत. पण दुसऱ्या प्राण्यांचे केस इतके दाट व कुरळे नसतात. बकऱ्यांचे केस लांब व सडक असतात, आणि त्यांचें कापड विणतात, व तें बळकट असतें. [illegible] उंटाच्या केसांचे [illegible] व गालिचे करितात. थंड देशामध्यें मुख्यत्वेंकरून लोंकरीचे कपडे [illegible] करितात. ह्याचें कारण ते हलके, मऊ, ऊबदार व सुखावह [illegible] असतात; आणि चांगले विणलेले असले तर फार दिवस टिकतात. हिवाळ्याच्या दिवसांत लोंकरीचे कपडे आपण घालितों. त्यांपैकीं कांहींचीं नांवें तुम्हांला सांगतां येतील काय?

**कासम**—होय. कोट, आंगरखे, बंड्या, जाकिटें, झगे, हातमोजे, पायमोजे, हे लोंकरीचे करितात.

**मास्तर**—बरोबर सांगितलेंस. लोंकरीच्या कपड्यांबद्दल आपण आणखी केव्हां तरी बोलूं; आणि त्या वेळीं लोंकरीचे कपडे चांगले कीं कापसाचे चांगले, तें पाहूं. आज इतकेंच पुरे.

---

## ७२. घर.



कृष्णा—हुसेन, हें पाहा आमचें नवें घर! हें बहुतेक पुरें होत आलें आहे. पुढल्या सोमवारीं पाडव्याच्या मुहूर्तानें आम्ही एथें राहण्यास येणार आहों. चल आंत, तुला तें मी दाखवितों. हें आमच्या घराचें पुढलें अंगण. एथें आम्हीं हा लहानसा बगीचा केला आहे. गेल्या पावसाळ्यांतच एथें फुलझाडें लाविलीं.

हुसेन—ह्या मोतियाला व गुलाबाला फुलें देखील आलीं! अरे, हें जोतें किती उंच! ह्याला पांच पायऱ्या आहेत.

कृष्णा—हें मुद्दाम इतकें उंच धरिलें आहे. सखल जोतें असलें म्हणजे घराला ओल येते, व ओल हें रोगांचें माहेर होय!

हुसेन—ही तुमची ओटी ना? हे खांब व तुळया खूप भक्कम आहेत. हीं सर्व सागवानी दिसतात. भिंती दगडी आहेत, पण आंतून त्यांना गिलावा केला आहे. ही लहानशीच खोली कसली रे?

कृष्णा—अरे, हें आमचें देवघर. देवघरांत आम्ही देव ठेवितों, व त्यांची पूजा करितों. तुमच्या घरांत देवघर नसतें, नाहीं?

हुसेन—छे! आमच्या घरांत देवघर नसतें. आम्ही मशिदींत जाऊन प्रार्थना करितों. तुमची जेवण करण्याची जागा कोठें आहे?

कृष्णा—चल दाखवितों. तें पाहा आमचें सैंपाकघर. त्याच्या पलीकडे ती कोठीची खोली.

हुसेन—सैंपाकघराला धुराडें केलें आहे, ही चांगली सोय आहे बुवा! ह्यानें घरांत धूर राहावयाचा नाहीं. सैंपाकघराला व कोठीच्या खोलीला खिडक्या व जाळ्या पुष्कळ ठेविल्या आहेत. जिकडे तिकडे उजेडच उजेड पडत आहे!

कृष्णा—अरे, म्हणतात ना, जेथें उजेड पुष्कळ व हवा खेळती, तेथें वैद्याचा शिरकाव होत नाहीं! कोठीच्यासमोर ती न्हाणी, व तिच्या पलीकडे ती लाकूडफाटें ठेवण्याची खोली. ते पाहा त्या कोपऱ्यांत दोन शौचकूप तयार होत आहेत. हें मागचें अंगण. एथें लहानशी बाग केली आहे. हें तुळशीवृंदावन. ह्यांत तुळस लाविली आहे. आम्ही हिंदू लोक तुळशीची पूजा करितों. हें माजघर. ह्याला इकडे एक खोली आहे, ती बाळंतिणीची खोली. चला आतां माडीवर जाऊं. हा माडीवर जाण्याचा जिना. ओटीवरूनही एक जिना आहे.

हुसेन—वा! माडीवरील दिवाणखाना खूप डौलदार आहे बुवा! खिडक्यांना तावदानें लाविलीं आहेत. दरवाजे खूप मोठे ठेविले आहेत. भिंतींना रंग देऊन वर नकशी काढिली आहे. तें वरतीं आढें. त्यावर वांसे, वाशांवर ओमण, व त्यावर कौलें

घातलीं आहेत. काय रे, अजून वरतीं पाटणी करावयाची राहिली आहे काय?

कृष्णा—होय. पाटणी अजून करावयाची आहे. पलीकडे ती पाहा गच्ची. तेथें सर्व चुन्याचें काम केलें आहे.

हुसेन—आतां उन्हाळ्यांत रात्रीं तूं हवा खात एथें पडणार वाटतें? अरे, माडीच्या भिंती विटांच्या आहेत व दर्जा चुन्यानें भरल्या आहेत! बरें, तुझी अभ्यासाची जागा कोणती?

कृष्णा—ही मागची माडी. हिला दोन खोल्या आहेत. त्यांतली मी एक अभ्यासाला घेणार, व दुसरी दादाला द्यावयाची. ही पुढली माडी. हिलाही दोन खोल्या आहेत. एक बाबांची निजावयाची, व दुसरी लिहिण्यावाचण्यास बसावयाची.

हुसेन—अरे, हा पुढला सज्जा मोठा मजेचा आहे! एथून बागेची शोभा चांगली दिसते. पण आतां चला, आपण घरीं जाऊं.

---

## ७३. वेळ समजण्याची जुनी रीत.

हरी—आजी, आज आम्हांला सुटी आहे. मी तीन वाजतां विठूकडे खेळावयास जाणार आहें. आजी, जाऊं ना? आतां तीन वाजले असतील, नाहीं?

आजी—हरी, तीन कोठचे इतक्यांत! त्या बघ त्या दगडाजवळ सावल्या आल्या आहेत. नुकते दोन वाजले. त्या पायरीजवळ सावल्या आल्या, म्हणजे तीन वाजतात.

हरी—सावलीवरून कशी ग तुला वेळ समजते? सावली हें तुझें घड्याळ वाटतें?

आजी—अरे घड्याळें हीं अलीकडे निघालीं. पूर्वीं सावलीवरून वेळ जाणण्याचें एक यंत्र असे. त्याला छायायंत्र म्हणतात. आपल्या माडीवर एक जुनें पडलें आहे, तें तुला आणून दाखवितें.

असें म्हणून ती तें यंत्र घेऊन आली; व अंगणांत एक खांब होता, त्याला दोन चुका मारून तें तिनें दक्षिणेकडे तोंड करून नीट बसाविलें.

हरी—आजी, ह्याला घड्याळाप्रमाणें तबकडी आहे, पण कांटे कोठें आहेत ?

आजी—अरे, ही काडी दिसते, तीच त्याचा कांटा. ह्याला तासाचा तेवढा एकच कांटा असतो; मिनिटाचा नसतो. ह्याच्यावरून किती वाजले सांग पाहूं ?

हरी—ह्या कांट्याची सावली दोन व तीन ह्यांच्या दरम्यान पडली आहे; म्हणजे दोन वाजून गेले पण तीन वाजले नाहींत. ह्यावरून दोन वाजून किती मिनिटें झालीं हें नाहीं ना कळत ? बरें, आजी, हें कसें ग केलें आहे ? ह्या सगळ्या तबकडीवर आंकडे नाहींत, अर्धीवरच आहेत. खेरीज ह्यांत बाराचा आंकडा खालच्या बाजूस कां घातला आहे ?

आजी—अरे, बारा वाजतां सूर्य आपल्या डोक्यावर येतो, तेव्हां ह्या कांट्याची सावली बरोबर खालीं पडेल कीं नाहीं ? म्हणून एथें बाराचा आंकडा घातला आहे.

हरी—समजलें आजी. सकाळीं सूर्य पूर्वेस असतो तेव्हां ह्या कांट्याची सावली पश्चिमेस पडेल, म्हणून एथें हा सहांचा आंकडा आहे. सूर्य जसजसा वर चढावयास लागेल तसतशी

सावली खालीं जावयास लागेल; म्हणून हे ७,८,९,१०,११ असे आंकडे मांडिले आहेत. बारांचा आंकडा हा बरोबर कांट्याच्या खालीं मांडिला आहे. पुन्हा सूर्य जसजसा पश्चिमेस जावयास लागेल, तसतशी सावली ह्या आंगानें म्हणजे पूर्वेकडे वर चढावयास लागेल; म्हणून १,२,३,४,५,६ हे आंकडे अशा रितीनें मांडिले आहेत. पण काय ग आजी, रात्र पडली किंवा दिवसा आभाळ आलें, तर ह्याचा काय उपयोग? मग कोठली सावली?



आजी—अशा वेळीं ह्याचा उपयोग नाहीं, खरा. म्हणून मग वाळूचीं घड्याळें निघालीं.

हरी—जुम्मामशिदींत वाळूचें घड्याळ आहे. तें काचेचें असून डमरूच्या आकाराचें आहे. त्यांतून हळूहळू वाळू पडत असते. सगळी वाळू खालच्या घरांत पडली म्हणजे तास वाजवितात, व तें घड्याळ उलटें करून ठेवितात. मग पुन्हा वाळू पडावयाला लागते. पण वाळू पडून गेली व त्यावेळीं तेथें कोणी नसलें, म्हणजे पुन्हा तें घड्याळ उलटें कोण करणार? मग वेळेचा सगळा घोटाळाच!

आजी—वाळूच्या घड्याळाला सारखा पहारेकरी पाहिजे, तरच वेळ बरोबर कळणार. जोशाच्या घटकेचीही स्थिति अशीच. बरें, तुला खेळावयास जावयाचें आहे ना? तीन वाजले. ती पाहा छायायंत्रांत तिहींवर सावली आली.

## ७४. वेळ समजण्याची नवी रीत.



हें चित्र घड्याळाचें आहे. घड्याळावर एक वाटोळी तबकडी बसविलेली असते, तिजवर एकापासून बारांपर्यंत आंकडे मांडलेले असतात. ते रोमन लोकांचे आंकडे आहेत. घड्याळ पाहतां येण्याला हे आंकडे ओळखतां आले पाहिजेत, म्हणून ते खालीं दिले आहेत :—

**रोमन आंकडे**:—I., II., III., IV., V., VI., VII., VIII., IX., X., XI., XII.,

**मराठी आंकडे** :—१, २, ३, ४, ५, ६, ७, ८, ९, १०, ११, १२.

प्रत्येक घड्याळांत एक लहान व एक मोठा असे दोन कांटे असतात. लहान कांटा किती अवर म्हणजे तास झाले, हें दाखवितो; व मोठा कांटा किती मिनिटें झालीं हें दाखवितो.

ह्या तबकडीवरील वर्तुळाचे ६० भाग केलेले आहेत, त्या प्रत्येकास मिनिट म्हणतात. पांच पांच भागांवर एक, दोन, तीन, असे बारापर्यंत रोमन आंकडे मांडलेले आहेत. ते तासाचे आंकडे होत.

मोठा म्हणजे मिनिट कांटा हा फार जलद चालतो, म्हणजे एका तासांत सगळें साठ मिनिटांचें वर्तुळ चालतो. तितक्याच वेळांत धाकटा म्हणजे अवर कांटा मिनिटांचीं पांच घरें चालून, एका आंकड्यावरून दुसऱ्या आंकड्यावर येतो.

बारा वाजतां दोन्ही कांटे बरोबर बारांच्या आंकड्यावर असतात. एक वाजेपर्यंत लहान कांटा बारांच्या आंकड्यावरून

एकाच्या आंकड्यावर चालत येतो, म्हणजे मिनिटांचीं पांच घरें एका तासांत चालून येतो. मोठा कांटा त्याच्या बारापट चालणारा आहे; म्हणजे सगळें वर्तुळ फिरून पुन्हा तो बारांच्या आंकड्यावर एक तासांतच येतो. ह्याचप्रमाणें दोन वाजतां लहान कांटा दोहोंच्या आंकड्यावर व मोठा कांटा बारांवर येतो. ह्याप्रमाणेंच पुढील तासांच्या वेळींही स्थिति होते.

आतां वरील चित्रांत अवर कांटा एक व दोन ह्या आंकड्यांच्या दरम्यान आहे. म्हणजे एक वाजून गेला, पण दोन वाजले नाहींत. मिनिट कांटा तिहींच्या आंकड्या पुढें तिसऱ्या घरावर आहे; म्हणजे तो तीना-पांचां पंधरा व तीन मिळून अठरा मिनिटें चालून आला आहे. म्हणून ह्या चित्रांत एक वाजून अठरा मिनिटें झालीं आहेत.

आतां समजा कीं लहान कांटा सात व आठ ह्यांच्या दरम्यान आहे, व मोठा कांटा पांचाच्या आंकड्यापुढें तीन घरें आहे; तर सात वाजून किती मिनिटें झालीं हें पाहूं. मोठा कांटा पांचाच्या आंकड्यापुढें तीन घरें आहे. म्हणून पांचा-पांचां पंचवीस आणि तीन अठ्ठावीस मिनिटें झालीं. म्हणजे अर्थात् सात वाजून अठ्ठावीस मिनिटें झालीं.

घड्याळांतील तबकडीच्या मागें एक कमान असते. तिला किल्ली दिली म्हणजे ती गुंडाळते. घड्याळ चालू असतां ती कमान हळूहळू उलगडत असते, त्यामुळें तिला जोडलेलीं चक्रें फिरूं लागतात. त्या चक्रांना हे कांटे जोडलेले असतात, म्हणून तेही फिरतात.

घड्याळांत आणखी एक कमान असते, तिलाही चक्रें

जोडलेलीं असतात. तीं चक्रें फिरतात, व त्यामुळें तास पुरा होतांच, आंत एक वाटी जोडलेली असते तिच्यावर, जितके तास झाले असतील तितके ठोके पडतात. म्हणजे सहा वाजले असले, तर सहा ठोके पडतात.

ह्याप्रमाणें घड्याळावरून आपणास किती वेळ झाला तें समजतें.

---

## ७८. तराजू.



विष्णुपंतांनीं मोरूला बाजारांतून शेरभर साखर आणावयास सांगितली. मोरू लागलाच आंगरखा टोपी घालून बाजारांत गेला, व साखरेचा पुडा त्यानें विष्णुपंतांजवळ आणून दिला.

विष्णुपंत—मोरू, ही साखर शेरभर का आहे ? अरे, ही कमीशी दिसते ? तुला वाण्यानें फसविलें वाटतें !

विष्णुपंतांनीं घरांतून तराजू काढिला, व एका पारड्यांत शेराचें वजन टाकून दुसऱ्या पारड्यांत ती साखर घातली, तों ती कमी भरली; म्हणून ते दुसऱ्या पारड्यात रुपये टाकूं लागले. दहा रुपये टाकिल्याबरोबर तराजू समतोल झाला. तेव्हां ते

म्हणाले, "पाहिलेंस का, मोरू, अदपाव साखर कमी आली; तुला वाण्यानें फसविलें!"

**मोरू**—नाहीं. मीं पारड्यांत टाकिलेलें वजन शेराचें आहे हें पाहिलें, आणि तागडी समतोल झाल्यावर वाण्यानें साखरेचा पुडा बांधून दिला.

**विष्णुपंत**—वजन बरोबर आहे कीं नाहीं हें पाहण्याला एवढ्याच गोष्टी पुरेतशा नाहींत. तागडीचीं पारडीं सारख्या वजनाचीं असावीं लागतात. एक जड व दुसरें हलकें असलें, आणि हलक्या पारड्यांत वजन टाकून जड पारड्यांतून जिन्नस वजन करून दिला, तर तो कमी भरावयाचाच. दुसरें असें कीं, दांडीच्या दोन्ही बाजू सारख्या असाव्या लागतात. एक बाजू दुसरीपेक्षां लांब असली, म्हणजे आपलें नुकसान होतें. अशा तागडीला 'दीडदांडी' म्हणतात.

**मोरू**—एक पारडें दुसऱ्यापेक्षां वजनानें जितकें जास्त असेल, तितका पदार्थ कमी भरेल, हें मी समजलों; पण दांडीच्या बाजू कमजास्त असल्या म्हणजे पदार्थ कमी कसा भरतो, तें नाहीं माझ्या लक्षांत आलें.

मग विष्णुपंतांनीं आपल्या तराजूच्या दांडीच्या मध्यापासून जरा अंतरावर दोरी बांधिली, व लांब भागाकडल्या पारड्यांत ती साखर, व आखूड भागाकडल्या पारडयांत शेराचें वजन टाकिलें. मग तो तराजू त्या दोरीला धरून उचलिला. तों तो समतोल राहिला. तेव्हां ते म्हणाले, "पाहिलेंस का? साखर शेरापेक्षां कमी असतां शेरभर आहे, असें दिसतें. ह्याचें कारण ह्या

दांडीचा वजनाकडील भाग साखरेकडील भागापेक्षां आखूड आहे. अरे, तुम्ही गाडीच्या जुंवावर बसून खेळत नाहीं काय ? जड मुलगा व हलका मुलगा जुंवावर बसून खेळत असले, म्हणजे काय युक्ति करितात तें तुला ठाऊक आहे ना ?"

मोरू—हो, हो; तो शेजारचा नारायण माझ्याच वयाचा व माझ्यासारखाच आंगानें काटकुळा आहे. जुंवाच्या एका टोंकाला तो व दुसऱ्या टोंकाला मी बसलों, तर जूं तोलून राहतें. पण तो किंवा मी एका टोंकाला बसलों, व दुसऱ्या टोंकाला आपल्या समोरच्या घरचा तो गणू बोंदला बसला कीं, स्वारी खालीं आलीच ! पण तो जरा सरकून अलीकडे बसला कीं जूं समतोल राहतें.

विष्णुपंत—मुलगा जसा जड असेल त्या मानानें त्याला जुंवाच्या मध्याकडे सरकावें लागतें. ह्यावरून तुझ्या लक्षांत आलें असेल कीं, आखूड दांडीकडल्या पारड्यांत शेराचें वजन टाकिलें तर त्याला तोलून धरण्याला लांब दांडीकडील पारड्यांत शेरापेक्षां कमी जिन्नस पुरे होतो.

मोरू—हो, पण आपण जर वाण्याला म्हटलें कीं, लांब भागाकडील पारड्यांत वजनें टाकून दुसऱ्या पारड्यांतून जिन्नस वजन करून दे, तर आपला पुष्कळ फायदा होईल.

विष्णुपंत—होईल खरा; पण तो कोठला तसें वजन करून द्यायला ? आपल्याला दीडदांडीचा संशय आला तर निमा पदार्थ एका पारड्यांत व निमा दुसऱ्यांत वजन करून घ्यावा, म्हणजे झालें. त्यांत आपला थोडासा फायदाच होतो.

# तिसऱ्या पुस्तकांतील कवितांमधील कठीण शब्दांचा अर्थ.

### ८. मुलांस बोध.

१. खरें.
२. योग्य रितीनें.
३. विचारानें.
४. मनांत.
५. मळकट.
६. नेहमीं.
७. कधींकधीं.
८. नेहमीं.
९. चांगल्या गुणांनीं मोठे.
१०. आराधना करण्यास योग्य.
११. मनांत, चित्तांत.
१२. आळस.
१३. फुटक्या कपाळाचा, अभागी.
१४. ढोंग.
१५. शोभविला.
१६. अनुभव.
१७. फुकट.
१८. भलेपणा.
१९. चांगल्या लौकिकाच्या रूपानें.

### १७. तान्हा भाऊ.

१. पाय.
२. तोंड.
३. आनंद देणारें.
४. डोळ्यांना.
५. मऊ.
६. आई.
७. सोबती.
८. तोंड.
९. हातांत.
१०. बोल.
११. सुख देणारा.
१२. झाला.
१३. तुझ्या सारखा.

### २५. खेळ.

१. सूर्यानें.
२. आपलें ऊन.
३. नाहींसे करण्याला.
४. वारा.
५. सृष्टीची शोभा.
६. डोक्यावर.
७. संतोष, आनंद.
८. झाडें.
९. त्यांची संगत.
१०. सुख देणारी.
११. सारखे.
१२. आनंद करून घ्या.
१३. मेहनत.
१४. बाळपण.
१५. मांस-पिंड.

### ३२. देवाची प्रार्थना.

१. नमस्कार असो.
२. ज्ञानाच्या सागरा.
३. गरिबांचा स्वामी.
४. जग उत्पन्न करणाऱ्या.
५. जगाचें पालन करणाऱ्या.
६. राजा.
७. आशा.
८. कृपेच्या सागरा.

९. वाईट.
१०. इच्छा, बुद्धि.
११. आटोपून धर.
१२. आपापलीं कामें करावयास लावण्याला.
१३. पदार्थांस.
१४. सामर्थ्य.
१५. हे ( ईश्वरा )
१६. ज्याची शक्ति सर्वत्र चालते असा.
१७. सर्व पाहणारा.
१८. जाणूं शकतो.
१९. आधार.
२०. दयेच्या समुद्र.
२१. नमवितो.
२२. फार, पापी.
२३. वाईट वर्तन करणारे.
२४. दयाळू.
२५. तारण कर.
२६. त्याग, धिक्कार.
२७. गरिबांची करुणा करणाऱ्या.
२८. प्रेम, माया.
२९. अतिशय चांगली.
३०. रस्ता.

## ३९. उपदेशपर फटका.

१. कठीण.
२. चाल.
३. सरळ, समोरचा.
४. सचोटी.
५. शुद्ध, स्वच्छ.
६. अधर्मांत.
७. ठपका.
८. मागणाराला, याचकाला.
९. देवघेवींत.
१०. खटपटी.
११. उणें.
१२. लाजवायाला.
१३. डबोलें, ठेव.
१४. मत्सर.
१५. श्रीमंत.
१६. अभिमान.
१७. राखवूं.
१८. पाठबळाच्या.
१९. दुर्लौकिक.
२०. कमी.
२१. बुडवूं.
२२. स्वतांच्या पैशाचा खर्च.
२३. मर्जी संपादणें.
२४. कंटाळू.
२५. पदरीं.
२६. द्रव्याचा सांठा.
२७. चांगल्या कामांत.
२८. खर्च.
२९. गुप्त.
३०. चांगल्या विचाराला.
३१. भिऊं.
३२. सोडूं.
३३. दुहीला.
३४. ईश्वरभक्तीला.
३५. विसरूं.
३६. नगाऱ्याच्या.
३७. ठोका.
३८. वाजे.
३९. संशय.

८०११९